# प्रस्तावना

शरदबाबूंच्या ज्या बऱ्याचशा लघुकथा आहेत त्यांत बंगाली समालोचकांच्या दृष्टीनें अभागीचा स्वर्ग आणि महेश या दोन लघुकथा उत्कृष्ट समजल्या जातात. या लघुकथा शरदबाबूंनीं आपल्या पहिल्या अमदानींत लिहिलेल्या आहेत. पुढल्या काळांत त्यांनीं लघुकथा अशा फारशा लिहिलेल्या नाहींत.

अभागीची कथा अत्यंत हृदयस्पर्शी आहे. ब्राह्मण आणि अस्पृश्य यांच्या लोकाचारांतील भूमिकेवरून उत्पन्न होणाऱ्या अत्यंत निर्घृण अशा भेदभावाच्या भूमिकेवर ती आधारलेली आहे. या दोन वर्गांत आचारविचारांच्या दृष्टीनें जो पंक्तिप्रपंच निर्दयपणें केला जातो त्याचें सरळसरळ चित्र या कथेंत रेखाटलें आहे.

कौशल्य आहे तें याच गोष्टींत, कीं असें चित्र रेखाटतांना शरद्-बाबूंनीं या भेदभावाच्या बाबतींत कोणत्याही प्रकारची विचिकित्सा केलेली नाहीं किंवा अस्पृश्यांची तरफदारी करून स्पृश्यांवर कोरडेही ओढलेले नाहींत. कलात्मक प्रचाराचा उत्कृष्ट नमुना म्हणून या गोष्टीचा उल्लेख करतां येईल.

हरिलक्ष्मी ही कथा बंगालमधील कुटुंबपद्धतींतील व्यंगें समोर मांडणाऱ्या शरदबाबूंच्या इतर बऱ्याचशा कथांपैकीं एक आहे. मराठी वाचकांना ही भूमिका तितकीशी आकलन होत नाहीं. बंगालच्या कुटुंबपद्धतींत श्रीमंत आणि गरीब या भेदामुळें ज्या विशिष्ट प्रकारच्या

समस्या निर्माण झालेल्या आहेत त्यांचें हरिलक्ष्मी हें एक चित्र आहे. मानवी स्वभावांतील सूक्ष्म संवेदना प्रदर्शित करण्यासाठीं लिहिलेली ही कथा बंगालच्या आवारांत निर्माण झालेली असली तरी भारतवर्षाच्या कोणत्याही प्रांतांत त्यांतील परिस्थिति हृदयगम्य व्हायला कठीण जाणार नाहीं.

महेश ही कथा असामान्य आहे असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं. एका दुर्दैवी मुसलमान कुटुंबाचा अगदीं थोडक्याशा शब्दांत सांगितलेला हा इतिहास आहे. बंगालचा मुसलमान हा बंगाली हिंदूपेक्षां मनोभूमिकेच्या दृष्टीनें मुळींच वेगळा नाहीं. कुटुंबांतील महेश या नांवाचा बैल हाही एक कुटुंबीयच आहे. गफूरचें त्याच्यावरचें प्रेम अपत्यप्रेमाच्या तोडीला येईल इतकें वात्सल्यपूर्ण आहे. बंगाल-मधील हिंदूंचा अस्पृश्यांप्रमाणेंच मुसलमानांनाही वागवण्याचा जो एक दृष्टिकोण आहे, त्या दृष्टीनें पाहतां अभागीची तुलना या कथेशींही करतां येईल. स्पृश्यास्पृश्यांप्रमाणेंच हिंदूमुसलमानांतील तेढ वाढायला इतर प्रांतांप्रमाणेंच बंगालमध्येंही उच्चवर्णीयांची अरेरावी वृत्तीच कशी कारणीभूत झाली आहे याचें हें चित्रण कोणत्याही प्रांताच्या दृष्टीनें उद्बोधक ठरल्यावांचून रहाणार नाहीं.

कलात्मक प्रचाराच्या दृष्टीनें ही गोष्टही आदर्शस्वरूप आहे.

हाजीकासम वाडी,
मुंबई नं. ७
१ मार्च १९४८.

मा मा व रे र क र

—०—

# अभागीचा स्वर्ग

## १

ठाकुरदास मुखर्जींची वयोवृद्ध स्त्री सात दिवसांच्या तापानें मरण पावली.

वृद्ध मुखोपाध्याय महाशय धान्याचा व्यापार करून चांगलीच पुंजी करून राहिले होते. त्यांचे चार मुलगे, तीन मुली, त्या मुलांमुलींची मुले, जावई—शेजारीपाजारी, नोकर-चाकर—जणूंकाय एक मोठा उत्सवच सुरू झाला म्हणून गोळा झाले होते.

साऱ्या गांवचे लोक मोठी गर्दी करून प्रेतयात्रा पहायला आले होते. गोळा झालेल्या बायका रडतरडत म्हातारीच्या पायाला आळता आणि कपाळाला धरधरून कुंकू फांशीत होत्या. सुना, मुली कपाळाला चंदन लावून सासूच्या देहावर मोलवान वस्त्रें गुंडाळून स्वतःच्या पदराने तिची शेवटची पायधूळ घेत होत्या. फुले, पत्री, चंदन, माळा हार यांची एव्हढी गर्दी झाली होती, गोंगाट एव्हढा चालला होता, की हा एक शोकाचा प्रसंग आहे असें मुळींच वाटले नसतें—मोठ्या घरची गृहिणी पन्नास वर्षे उलटल्यावर पुन्हा जणूं काय नव्या नवरीप्रमाणें सासरीं जायला निघाली होती.

वृद्ध मुखोपाध्यायांची मुद्रा शांत होती, आड तोंड करून डोळ्यांत आलेलीं दोन आंसवें पुसून टाकून जन्माच्या सोबातिणीचा

शेवटचा निरोप घेतल्यावर दुःखानें व्याकुळ झालेल्या सुनामुलींचें ते सांत्वन करीत होते. हरिध्वनीनें सारें आकाश दणाणून टाकीत सारा गांव बरोबर चालला होता.

आणखीं एक व्यक्ति थोडयाशा दूर अंतरावर राहून या मेळाव्या-बरोबर चालली होती ती कंगालची आई. आंगणांतल्या बागेतलीं दहापांच वांगीं घेऊन ती बाजारांत विकायला निघाली होती, पण हें दृश्य पाहातांच तिच्यानें पुढें जाववेना. बाजाराला जाणें राहिले, ओच्यांत घेतलेलीं वांगींही तशींच राहिलीं—डोळ्यांतलीं आंसवे पुशीतपुशीत ती सर्वांच्या मागोमाग स्मशानांत येऊन हजर झाली.

गांवच्या एका टोंकाला गरूड नदीच्या कांठीं स्मशान होते. तिथे आदल्या दिवसापासून लाकडांचे भारे, चंदनाचे तुकडे, तूप, मध, धूप वगैरे जिन्नस तयार ठेवले होते. कंगालची आई हलक्या जातीची—बुरुडाची बाई, म्हणून तिला जवळ जाण्याचें धैर्य झाले नाहीं. थोडयाशा अंतरावर एका उंच मातीच्या ढिगाऱ्यावर उभी राहून ती पहिल्यापासून शेवटपर्यंत सारी अंत्येष्टीक्रिया डोळ्यांत जीव आणून पाहात राहिली होती. भल्यामोठ्या ऐसपैस चितेवर ज्यावेळीं शव ठेवण्यांत आलें त्यावेळीं ते आळत्यानें रंगलेले पाय दिसतांच तिची नजर खिळून गेली. धांवत जावें आणि त्यांतील बोटभर आळता काढून घेऊन माथ्याला लावावा असें तिला वाटलें. शेंकडों लोकांच्या तोंडचा हरिध्वनि सुरू असतांना मुलानें मंत्रपूत अग्नि ज्यावेळीं चितेला लावला त्यावेळीं तिच्या डोळ्यांतून आंसवांच्या सारख्या धारा वाहूं लागल्या.

मनांतल्या मनांत ती सारखी म्हणूं लागली, –' भाग्यवती आई, तूं स्वर्गाला गेलीस–माझ्या कंगालच्या हातचा अग्नि मिळून मी सुद्धां अशीच जाईन एव्हढा मला आशीर्वाद दे.'

मुलाच्या हातचा अग्नि! ती कांहीं अशीतशी गोष्ट नव्हती! नवरा, मुलगे, मुली, नातू, नाती, दासदासी, इष्टमित्र–सारा संसार उजळ ठेवून झालेलें ते स्वर्गारोहण पाहून तिचे हृदय फुलूनफुलून उठूं लागले. या सौभाग्याची मर्यादा तिला ठरवतां येईना.

नुकत्याच पेटवलेल्या चितेतून निघणाऱ्या अजस्र धूराची निळ्यानिळ्या रंगाचीं वर्तुळे फेऱ्या घेतघेत आकाशाकडे जात होती. कंगालच्या आईला त्या धूराच्या वलयात एक रथाची आकृति स्पष्ट दिसून आली. त्या रथावर किती किती चित्रे काढलेली होतीं. त्याचा कळस फुलवेलींनीं श्रृंगारलेला होता. आत कोण बसले होते तें तिला नीटसे ओळखतां आलें नाहीं–पण तिच्या भांगांत सिंदुर होता, दोन्ही पाय आळत्यानें रगवलेले होते.

वर त्या रथाकडे पाहात असतांना तिच्या दोन्ही डोळ्यांतून आंसवांच्या धारा वाहात होत्या. इतक्यांत एक चवदा–पंधरा वर्षाचा मुलगा तिचा पदर धरून ओढून म्हणाला, " तूं इथे उभी राह्यलीयस आई, तिकडे सैपाक कोण करील ? "

आईनें दचकून वळून पाहिले आणि म्हटले, " होईल रे सैपाक–! " वर बोट दाखवून ती व्यग्र होऊन म्हणाली, " पाहा पाहा बाबा, बामणाची आई रथांत बसून स्वर्गाला जातेय ! "

मुलगा अचंबित होऊन वर पाहून उद्गारला, " कुठ ?– " क्षणभर निरखून पाहून तो शेवटीं म्हणाला, " वेड लागलय तुला.

तो धूर आहे नुसता—!" तो रागारागानें म्हणाला, "दिवस माथ्यावर आला तरीसुद्धां मला भूक लागूं नये वाटतं?" त्याचवेळीं आईच्या डोळ्यांत पाणी आले आहे असे पाहून तो म्हणाला, "बामणाची आई मेली म्हणून तूं कां रडून मरतेयस आई?"

कंगालची आई आतां भानावर आली. स्मशानांत उभे राहून परक्या माणसासाठी आपण आंसवें गाळीत असल्याची जाणीव होऊन ती मनांतल्या मनांत शरमली— एव्हढेच नव्हे तर असें रडल्यानें मुलाचें अकल्याण होईल ही शंका मनांत येतांच लगेच डोळे पुसून हंसायचा थोडासा प्रयत्न करीत ती म्हणाली, "मी कशाला रडेन रे? हा धूर लागतोय ना डोळ्याला!"

"हं : धूर लागतोय म्हणे! तूं रडतच होतीस!"

यावर आई कांहीं बोलली नाहीं. मुलाचा हात धरून ती घाटाखालीं उतरली, स्वतः स्नान करून तिनें कंगाललाही स्नान घातलें आणि दोघेंही घरीं परतलीं. स्मशानांतला उत्तरक्रियेचा विधि शेवटपर्यंत पाहाणे काहीं तिच्या भाग्यीं नव्हतें.

२

मुलाला नांव ठेवतांना आईबाप जो मूर्खपणा करतात तो पाहून अंतरिक्षांतून विधाता पुरूष नुसता हंसूनच स्वस्थ राहात नाहीं—तो चांगलाच कडक विरोध करतो. म्हणूनच त्या व्यक्तीचें सारें जीवन त्याच्या नांवाला साजेसें न होतां वेगळ्याच प्रकारचें होत असतें. कंगालच्या आईच्या जीवनाचा इतिहास अगदीं छोटाच होता. पण

त्या छोट्याशा कंगाल जीवनाला अशा प्रकारच्या विधात्याचा परिहासापासून उत्पन्न होणारा विरोध मात्र जाणवला नव्हता.

ती जन्माला आली त्याच वेळीं तिची आई मरण पावली. म्हणून बापानें रागारागाने तिचे नाव ठेवलें अभागी. आई नाहीं, बाप सारखा नदीकाठी मासे मारीत हिंडत राही. त्याच्या हिशेबीं नव्हता दिवस की नव्हती रात्र. तरीही ती बिचारी अभागी कंगालची आई होईपर्यंत कशी जगून राहिली हेच एक मोठे आश्चर्य होते.

ज्याच्याबरोबर तिचें लग्न झाले होते त्याचे नाव होते रसिक वाघ. त्या वाघाची आणखी एक वाघीण होती, तिला घेऊन तो दुसऱ्या कुठें निघून गेला. बिचारी अभागी आपले अभाग्य आणि छोटा कंगाल याना घेऊन गावातच पडून राहिली होती.

तिचा तो कंगाल आता मोठा होऊन पंधराव्या वाढदिवसापर्यंत आला होता. नुकताच तो वेतकाम शिकण्यासाठीं जाऊं लागला होता. अभागीला वाटत होते, की आता एकदोन वर्षांत तो आपल्या अभाग्याबरोबर झुंज द्यायला समर्थ होईल आणि आपलें दैन्य दूर होईल. हे दैन्य कोणत्या प्रकारचें होते ते, ज्याच्या कृपेनें तें मिळालें होते त्याच्याखेरीज इतरांना कळलें सुद्धां नव्हतें.

कंगाल आंचवण्यासाठी तळयावर गेला होता. तो जेव्हां परत आला, तेव्हां त्याला दिसून आलें कीं त्याचें जेवण झाल्यावर राहिलेले अन्न त्याच्या आईने एका मातीच्या भांड्यात झांकून ठेवले होते. तो अचंबून म्हणाला, "तूं जेवली नाहींस आई?"

"वेळ उलटून गेली बाबा. आतां भूक नाहीं मला."

मुलाला तें पटलें नाहीं. तो म्हणाला, " नाहीं—भूक नाहीं म्हणजे काय?—पाहूं. दाखव तुझी हंडी. "

कित्येक दिवस कंगालची आई अशाच प्रकारे कंगालला फसवीत आली होती. आतां त्यानें हंडी पाहून घेतली तेव्हा त्याचें समाधान झालें. त्या हंडींत एका माणसाला पुरेसा भात होता.

मोठ्या खुषींत येऊन तो आईच्या मांडीवर बसला. त्याच्या वयाचीं इतर मुलें सहसा अशीं बसत नव्हतीं—पण लहानपणीं तो वारंवार आजारी पडत असल्यामुळे असाच आईच्या मांडीवर बसून वाढला होता. बाहेरच्या सौंगडयांबरोबर मिसळायचा योग त्याला कधींच आला नव्हता. काय त्याचे जे खेळ चालायचे ते सारे । आईच्या मांडीवरच.

एक हात आईच्या गळ्यांत टाकून आईच्या गालाला गाल लावतांच कंगाल एकदम दचकला आणि म्हणाला, "आई, तुझं आंग गरम झालय. उभ्या उन्हांत उभं राहून कशाला गेली होतीस ते भाजलेलं मढं पाह्यला? अन् आल्यावर आंघोळ तरी कशाला केलीस? मढीं जाळलेली काय तूं—"

आई अस्वस्थ होऊन त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हणाली, "छे रे बाबा, मढं जाळणं म्हणायचं नाहीं. पाप लागेल. सतीलक्ष्मी बामणाची आई रथांत बसून स्वर्गाला गेली. "

मुलाला शंका वाटली. तो म्हणाला, " तुझं भलतंच कांहींतरी आई! रथांत बसून कधीं कुणी स्वर्गाला गेलंय?"

आई म्हणाली, "अरे, ती बामणाची आई रथांत बसलेली मी स्वतःच्या डोळ्यानं पाह्यली रे कंगाल. तिचे ते आळता लावलेले पाय सर्वांनी अगदी उघड्या डोळ्यांनी पाह्यले रे बाबा !"

"सर्वांनीं पाह्यले ?"

"अगदी सर्वांनी पाह्यले."

आईच्या खांद्यावर मान टाकून बसून कंगाल विचार करू लागला. आई सांगेल त्याच्यावर विश्वास ठेवायचा ही त्याची नित्याची संवय. लहानपणापासून त्याला हेच शिक्षण मिळाले होते. सर्वांनी उघड्या डोळ्यांनी ही अजब गोष्ट पाहिली असे ज्याअर्थी त्याच्या आईनेच सांगितले त्याअर्थी संशय घ्यायला आतां जागाच राहिली नव्हती.

थोड्या वेळाने तो हळुहळू म्हणाला, "तर मग आई, तूं देखील अशीच स्वर्गाला जाशील ? बिंदीची आई त्या दिवशीं राखालच्या आत्याला सांगत होती, कीं कंगालच्या आईसारखी सतीलक्ष्मी या बुरूडवाड्यांत दुसरी कुणी नाही."

कंगालची आई स्तब्ध होऊन राहिली. कंगाल तसाच शांतपणें बोलत होता, "बाबांनीं जेव्हां तुला टाकलं तेव्हा कितीतरी लोक तुला म्होतुर लावायला सांगत होते. पण तूं म्हटलस, नाहीं. तूं म्हटलंस, माझा कंगाल जगलावाचला तर माझं दुःखदैन्य दूर होईल. मग मी म्होतुर कशाला लावूं ? नाहीं का आई, तूं म्होतुर लावलं असतंस तर आज माझी काय दशा झाली असती ? कदाचित उपासपोटीं मी इतक्यांत मरून सुद्धां गेलों असतों."

आईने दोन्ही हातांनीं मुलाला धरून हृदयाशी कवटाळले. खरे बोलायचे म्हणजे, त्यावेळीं कितीतरी लोकांनीं तिला असा सल्ला दिला होता. त्याचप्रमाणे कांहीं केल्या ती म्होतुर लावायला राजी होत नाही असे पाहून कित्येकांनीं तिला शक्य तितका उपद्रव द्यायलाही कांहीं कमी केले नव्हते. ती हकिगत आठवली तेव्हा तिच्या डोळ्यांवाटे पाणी आले. तिच्या डोळ्यातले पाणी पुसून मुलगा म्हणाला, " गोधडी आथरूं का आई ? निजतेस का ? "

आई कांही बोलली नाहीं. कंगालने चटई आथरली. वर गोधडी टाकली, माच्यावरची लहानशी उशी घेऊन त्यानें तिचा हात धरून तिला नेऊन बिछान्यावर निजवलें.

ती म्हणाली, " कंगाल, आज कांहीं कामावर जाऊं नकोस."

काम चुकते आहे याजबद्दल कंगालला आनंद झाला खरा पण तो म्हणाला, " पण गेलों नाहीं तर आजच्या दिवसाचे दोन पैसे देणार नाहींत आई. "

" न कां देईनात ? ये–तुला एक छानशी गोष्ट सांगतें. "

यावर आणखीं आमिष दाखवायचे कारण राहिलें नाही. कंगाल एकदम आईच्या कुशींत शिरून आडवा झाला आणि म्हणाला, " सांग तर मग–राजपुत्र, कोतवालपुत्र आणि पक्षिराज घोडा–"

अभागीने राजपुत्र, कोतवालपुत्र आणि पक्षिराज घोडयाच्या गोष्टीने सुरवात केली. ती गोष्ट तिनें दुसऱ्याकडून जशी कितीतरी वेळां ऐकली होती तशीच त्यालाही कितीतरी वेळां ऐकवली होती. पण थोडयाच वेळांत तो राजपुत्र कुठल्या कुठें गेला आणि तो कोतवाल- पुत्रही

कुठें नाहींसा झाला-तिनें अशी एक गोष्ट सांगायला सुरवात केली, की ती तिनें कधीं कुणाच्या तोंडून ऐकलेली नव्हती. ती तिची स्वतःची कल्पना होती. तिच्या अंगांतला ताप जसजसा वाढूं लागला, गरम झालेले रक्त जसजसे मस्तकाकडे वाहूं लागले, तसतशा तिला नव्या नव्या कल्पना एकामागून एक सारख्या सुचूं लागल्या. ती नव्यानव्या कथांचे इंद्रजाल रचीत होती. त्याला अंत नव्हता, तूट नव्हती. त्या गोष्टी ऐकतांच कंगालच्या चिमुकल्या देहावर रोमांच उभे रहात होते. भीतीमुळें, आश्चर्यामुळें, रोमांचित झाल्यामुळें तो जोरजोराने आईच्या गळयाला मिठी मारून तिच्याशीं एकजीव होऊन जात होता.

बाहेर दिवस सपला होता. सूर्य अस्ताला गेला होता. संध्याकाळची कोवळी साऊट वाढत जाऊन सर्वत्र झांप घालीत होती. पण आज त्या घरांत दिवा लागला नव्हता. गृहस्थाघरचें रोजचें नित्यकर्म सारण्यासाठीं कुणींही उठलें नाही. त्या घनदाट काळोखांत आजारी आईच्या तोंडून सारख्या निघणाऱ्या कथेच्या प्रवाहाचें गुंजन त्या मुलाच्या कानांत अमृताचा वर्षाव करीत होतें–

तेंच स्मशान–आणि तीच ती त्या स्मशानयात्रेची गोष्ट ! तोच रथ, तीं तिचीं रंगलेलीं पावलें, आणि तेंच तिचें स्वर्गारोहण. तिच्या वियोगानें दुःखी झालेल्या नवऱ्यानें शेवटीं पायधूळ देऊन रडतरडत कशा प्रकारें निरोप दिला, हरिध्वनी करीत मुलांनीं आईला कशा प्रकारें खांदा देऊन स्मशानांत नेलें,- आणि त्यानंतर खुद्द मुलाच्या हातचा मिळालेला अग्नि !—

" तो अग्नि म्हणजे अग्नि नव्हे रे कंगाल, तो तर प्रत्यक्ष श्रीहरी ! आकाशाच्या वाटेनं जाणारा तो धूर म्हणजे धूर नव्हे रे बाबा, तो तर स्वर्गाचा रथ ! कंगालीचरण, माझ्या बाळा !— "

" काय आई ? "

" तुझ्या हातचा अग्नि जर मिळेल बाबा, तर मी सुद्धा बामणाच्या आईसारखी स्वर्गाला जाईन. "

कंगाल तोंडांतल्या तोंडात पुटपुटला, " वा ! हें काय सांगायला हवं ? "

ते त्याचे उद्गार आईच्या कानी गेले नाहींत. तापाच्या भरांत गरम सुस्कारे टाकीत ती बोलत होती, " —मग हलक्या जातीचे म्हणून कुणी आम्हांला नांव ठेवणार नाहीत. गरीब दुःखी म्हणून कुणी आम्हांला दूर लोटणार नाहींत. अहाहा ! मुलाच्या हातचा अग्नि !—रथ आलाच पाहिजे ! "

आईच्या तोंडावर तोंड ठेवून मुलगा रडकुंडीला येऊन म्हणाला, " बोलूं नकोस आई, असं कांहीं बोलूं नकोस. मला भारी भीति वाटते. "

आई बोलत होती, " —अन् असं पाहा कंगाल, तुझ्या बाबांना एकदां धरून बांधून आण,–ते आले म्हणजे आपली पायधूळ देऊन मला शेवटचा निरोप देतील ! —अन् असाच पायाला आळता, कपाळभर कुंकू,–पण कोण करील हें सारं ! तूं करशील ना हें सारं कंगाल ? तूंच माझा मुलगा, तूंच माझी मुलगी. तूंच माझं सारं कांहीं ! – " बोलतां बोलतां तिनें मुलाला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरलें.

३

अभागीच्या जीवननाटकाचा शेवटचा अंक संपत येऊं लागला होता. ते जीवनही फारसें मोठे नव्हते. अगदी सामान्य होते. आज तिचे तिसावे वर्ष पुरते झाले होते की काय याची शंका होती, आणि तेही अगदी सामान्यपणे संपत आलें होतें.

गांवांत वैद्य नव्हता. तो दुसऱ्या गांवी राहात होता. कंगाल त्याच्यापाशी जाऊन रडला, ओरडला, हातीपायीं पडला, शेवटीं एक भांडे गहाण टाकून त्याने त्याला एक रुपया प्रणामी म्हणून दिला.

तो स्वतः कांहीं आला नाही. त्याने नुसत्या औषधाच्या चार वडया दिल्या. त्या द्यायचे अनुमानसुद्धां मोठ्या अवडंबराचे होते. मध, आल्याचा रस, तुळशीच्या पानाचा रस घालून खल करायचा—कंगालची आई मुलावर रागाला येऊन म्हणाली, "मला न सांगतां कशाला रे बाबा भांडं गहाण टाकायला गेलास ?"

हात पुढें करून तिनें त्या वडया मागून घेतल्या आणि मस्तकाला लावून चुलींत फेंकून देऊन ती म्हणाली, "बरी झाले तर अशीच होईन. बुरडासुरडाच्या घरचीं माणसं औषध घेऊन बरीं होत नसतात !"

अशा प्रकारें दोनतीन दिवस गेले. शेजारपाजारचीं माणसे तिच्या प्रकृतीची खबर लागली म्हणून पाहायला आलीं. ज्यांला जे घरगुती उपाय मोहित होते ते तो सांगूं लागला.—सांबराचें शिंग उगाळून द्यायचें, कवडी जाळून तिची राख मधांतून चाटायला द्यायची,

वगैरे कसलींतरी औषधें सांगून एकेकजण निघून गेला. कंगाल बिचारा पोरसवदा. त्याचा जीव खालीवर झाला असें पाहून आई त्याला जवळ ओढून म्हणाली, " वैद्याच्या औषधानं कांहीं झालं नाहीं बाबा, तिथं यांच्या या औषधानं काय होणार ? मी अशीच बरी होईन. "

कंगाल रडतरडत म्हणाला, " वैद्याचं औषध तूं कांहीं घेतलं नाहीस आई ! चुलींत फेंकून दिलंस, अशानं का रोग बरा होणार ? "

" मी अशीच बरी होईन रे. त्यापेक्षा तूं घांसभर भात टाक चुलीवर अन् खाऊन घे. मी पाहाते तूं कसा जेवतोस तो. "

कंगाल पहिल्यानेच जेवण करायला बसला. त्याला ती संवय नव्हती. भाताची पेज त्याला वाळतां येईना, कीं शिजवलेला भात वाढतां येईना. आधीं त्याची चूलच मुळीं पेट घेत नव्हती. आधणाचें पाणी चुलीत उताला जाऊन चोहीकडे सारा धूरच धूर होत होता, तें पाहून बिचाऱ्या आईचे डोळे पाण्याने भरून आले. तिने एकदां स्वतः उठायचा प्रयत्न केला, पण तिची मान तिला सांवरेना. ती बिछान्यांत कोसळून पडली.

जेवण झाल्यावर मुलाला जवळ घेऊन कोणत्या वेळीं कसें काय करायचें याचें शिक्षण जेव्हां ती त्याला देऊं लागली त्या वेळीं बोलतांबोलतां तिच्या तोंडचा शब्दच उमटेना. डोळ्यांवाटे नुसत्या आंसवांच्या धारा चालू राहिल्या होत्या.

गांवातला ईश्वर न्हावी नाडी पाहात असे. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो आला आणि हात पाहून त्यांच्यासमोरच चेहेरा गंभीर

करून बसला. एक मोठा सुस्कारा सोडून शेवटीं नुसती मान हालवून उठून तो निघून गेला.

त्याचा अर्थ कंगालच्या आईला कळला पण ती कांही घाबरली नाही. सारे लोक उठून गेल्यावर ती मुलाला म्हणाली, "आतां एकदां त्याना बोलावून आणशील का बाबा ?"

"कुणाला आई ?"

"अरे त्याना रे—त्या गावी जाऊन राह्यलेयत ते, त्याना—"

कंगालला आता कळले. त्याने विचारले, "बाबांना का ?"

अभागी कांहीं बोलली नाही.

कंगाल म्हणाला, "ते येतील का ग आई ?"

अभागीला सुद्धा या बाबतीत बरीच शंका होती तरीही ती म्हणाली, "तूं जा अन् त्याना साग कीं म्हणाव, आईला नुसती तुमची पायधूळ हवीय."

तो ज्यावेळीं जायला निघाला त्यावेळीं त्याचा हात कडकडून धरून ती म्हणाली, "हे बघ, थोडं रडून ओरडून पाहा बाबा—म्हणावं, आई चाललीय—"

क्षणभर थाबून ती म्हणाली, "—परत येतांना तसाच न्हाव्याच्या वहिनीकडे जा, अन् तिच्याकडून थोडा आळता घेऊन ये बरं का कंगाल—माझं नांव सांगितलंस कीं देईल ती. मोठा लोभ आहे तिचा माझ्यावर."

पुष्कळांचाच तिच्यावर लोभ होता. ताप येऊं लागल्यापासून आईच्या तोंडून या कांहीं जिनसांच्या बाबतींत त्यानें इतक्या प्रकारें

आणि इतका वेळ ऐकलें होतें, की तो आतां थरथर कांपत तिथून जायला निघाला.

## ४

दुसऱ्या दिवशीं रसिक बुरूड योग्य वेळीं जेव्हां येऊन हजर झाला तेव्हां अभागी फारशी शुद्धीवर आली नव्हती. तिच्या चेहेऱ्या-वर मरणाची कळा स्पष्ट उठून दिसत होती. डोळ्यांतील नजर या जगाचें काम संपवून कोणत्यातरी अज्ञात देशाचा प्रवास करण्यासाठीं चालती झाली होती.

कंगाल रडतरडत म्हणाला, " आईग, बाबा आले आहेत— पायधूळ घेणार आहेस ना ? "

त्याचें बोलणें बहुधा तिला कळले असावें— बहुधा तिची इतक्या दिवसांची साठवलेली अंतरांतील उत्कट वासना तिच्या नाहींशा होऊं पाहाणाऱ्या चैतन्याला संस्कारानुरूप धक्का देत असावी. मरणाच्या मार्गावर असलेल्या त्या यात्रेकरूनें आपला निर्जीव हात कसाबसा बिछान्याच्या बाहेर सारून पुढें पसरला.

रसिक हतबुद्ध झाल्यासारखा उभा राहिला होता. या जगांत आपल्या पायधुळीला कांहीं किंमत आहे, कुणीतरी हीं पायधूळ केव्हांतरी मागेल, अशी त्याला कधीं कल्पनासुद्धां झाली नव्हती. बिंदीची आत्त्या तिथें उभी होती ती म्हणाली, " दे रे बाबा, दे थोडीशी पायधूळ ! "

रसिक पुढें सरसावला. आयुष्यात त्याने आपल्या या बायकोला प्रेमाचा वांटा तर कधी दिलाच नव्हता; अन्नवस्त्र दिले नव्हते, तिची कधी खबर सुद्धां घेतली नव्हती, पण या तिच्या मरणकाली तिला आपली पायधूळ देतांना त्याला एकदम रडें कोसळले.

राखालची आई उद्गारली, " असली ही सतीसावित्री भटा-ब्राम्हणाच्या घरीं जन्म न घेतां कशाला या बुरडाच्या घरी जन्माला आली ? आतां तरी बाबा तिला सद्गति द्यायची काही तजवीज कर— कंगालच्या हातून आग मिळायच्या आशेनच बिचारीनं असा हा जीव दिलाय."

अभागीच्या दुर्भाग्यदेवतेने अगोचर बसून काय ठरवले होतें कोण जाणे—पण बिचाऱ्या छोट्या कंगालच्या छोट्या हृदयास ते शब्द बाणासारखे भेदून गेले.

त्या दिवशीं दिवस कसाबसा गेला—रात्रीचे पहिले प्रहरही तसेच गेले—पण कंगालच्या आईला पहाट होईपर्यंत वाट पाहायचें कांही जमलें नाहीं. असल्या हलक्या कुळांत जन्म घेतलेल्या जीवासाठी स्वर्गांत रथाची व्यवस्था आहे की नाही, की काळोखांतून पायपीट करीतच त्यांना जावे लागते कीं काय कोण जाणे—पण एव्हढे मात्र कळून चुकलें, की रात्र संपायच्या पूर्वीच हे जग सोडून ती निघून गेली होती.

घराच्या आंगणांतच एक बेलाचे झाड होतें. कुऱ्हाड घेऊन रसिक त्याच्या मुळावर घाव घालतो न घालतो तोंच जमीदाराचा दरवान

कुठून धांवत आला आणि त्यानें कशी एक शिवी हांसडून त्याच्या थोबाडींत भडकावली तें कळले नाहीं.

त्याच्या हातची कुऱ्हाड काढून घेऊन तो म्हणाला, "झाड तोडायला निघालास. ते काय तुझ्या बापाचं आहे रे साल्या?"

रसिक हाताने गाल चोळीत होता. कंगाल रडकुंडीला येऊन म्हणाला, "हे झाड तर माझ्या आईनं आपल्या हातान लावल होतं दरवानजी, बाबांना कां तुम्ही उगीच मारल?"

तो हिंदुस्तानी दरवान ओंगळ भाषेत शिव्या देत त्यालाही बडवूं लागला. पण आईच्या मृत देहाची शिवाशीव झालेली असल्यामुळे अशौचाच्या भीतीने त्याने त्या दरवानाच्या अंगावर हात टाकला नाही.

आरडाओरड झाल्यामुळे तिथे लोकांची गर्दी जमली. जमीदाराची परवानगी घेतल्याशिवाय रसिक झाड तोडायला गेला हें बरे केले नाही असेच सर्वांचे मत पडले. कृपा करून झाड तोडायला हुकूम द्यावा म्हणून ते दरवानजीच्या हातीपायीं पडूं लागले. ते अभागीला भेटायला आले होते त्यावेळी तिने आपली ही शेवटची इच्छा बोलून दाखवून त्याजकडून वचन घेतले होते.

दरवान कांहीं अशी सामान्य व्यक्ति नव्हती. असल्या भूलथापांवर तो कसा विश्वास ठेवील? मोठे हातवारे करून माना हालवून त्याने सांगितले, कीं असली चलाखी आपल्याकडे कांही पचायची नाही.

गांवचा जमीदार कांहीं त्या गावीं राहात नव्हता. गावांत त्याची एक कचेरी होती. अधरराय हा त्याचा गुमास्ता होता आणि सारे अधिकार त्याच्या हातीं होते.

जमलेले लोक हिंदुस्तानी दरवानापाशीं हजार प्रकारें काकुळती, विनवणी करीत राहिले आहेत असे पाहून कंगालने जी धूम ठोकली ती तडक या कचेरीकडे. लोकाच्या तोंडून त्याने ऐकले होते, कीं शिपाईप्यादे लोकांकडून लांच घेतात. त्याची अगदीं खात्री होती कीं अधिकारी माणसाच्या कानी एवढा मोठा अन्याय आणि अत्याचार होत असलेला घातला तर त्या नोकराला खात्रीने शिक्षा केली जाईल.

गरीब बिचारा खुळा पोर ! बंगाल देशचे जमीदार आणि त्यांचे अधिकारी यांची त्याला ओळख नव्हती.

नुकतीच आई गमावलेले ते पोर दुःखाने चुरडले होतें. आल्या प्रसंगामुळें बेभान होऊन तो एकदम वर चढून गेला. नुकतीच स्नानसंध्या आटोपून थोडासा फराळ करून अधरराय तितक्यांत बाहेर येत होता तो त्याला पाहून आश्चर्यचकीत झाला. रागारागानें तो म्हणाला, “कोण रे तूं ?”

“मी कंगालीचरण. दरवानजीनं माझ्या बाबांना मारलं.”

“छान केलं ! हरामजाद्यांनं खंड भरला नाहीं वाटतं ?”

कंगाल म्हणाला, “नाही बाबू महाशय, बाबा झाड तोडीत होता–माझी आई आतांच वारली–” बोलतां बोलतां त्याला भडभडून आलें, रडें अनावर झाले.

सकाळच्या प्रहरीं ही रडारड सुरू झालेली पाहून अधरबाबू अत्यंत रागाला आले. मढ्याला शिवून आलेला हा पोर—यानें घरांत कुठें शिवाशिव केली कीं काय कोण जाणे !

त्याला धमकावून ते म्हणाले, " आई मेली तर जा खालीं जाऊन उभा रहा. कोण आहे रे तिकडे ? इथं थोडं शेणपाणी घालून टाका पाहूं ! तुझी जात काय रे ? "

कंगाल घाबरला आणि ओटीखालीं उतरून उभा राहून म्हणाला, " आम्ही बुरूड. "

अधरबाबू उद्गारले, " बुरूड ! बुरुडाच्या मढ्याला लाकडं रे कशाला ? "

कंगाल म्हणाला, " आईनं मला सांगितलं होतं अग्नि द्यायला. तुम्ही कुणालाही विचारा बाबू महाशय. सर्वांनाच सांगितलं होतं आईनं. सर्वांनींच ऐकलंय.–" आईचे बोल सांगतांना तिने पुन्हापुन्हा क्षणोक्षणीं केलेली विनवणी आठवून त्याचा गळा भरून आला, रडू कोसळतांना गळा फाटायला आला.

अधर म्हणाला, " आईला भाजायचं असेल तर झाडाची किंमत पांच रुपये घेऊन ये. देतोयस ? "

ही गोष्ट अशक्य होती हें कंगालला माहित होते. उत्तरक्रियेसाठी त्याला हवें असलेले कापड खरेदी करण्याकरतां त्याची जेवणाची थाळी एक रुपयासाठीं गहाण ठेवायला बिंदीची आत्त्या गेली होती तें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें होतें.

त्यानें मान हालवून म्हटलें, " नाहीं. "

अधर रागारागाने तोंड वेंगाडून म्हणाला, " नाही ना ? मग आईला नेऊन नदीच्या काठीं एक खड्डा खणून पूर. कुणाच्या बापाचं झाड तोडायला गेला होता हरामखोर ? पाजी ! दळभद्रा ! डांबीस ! "

कंगाल म्हणाला, "तें आमच्या अंगणांतलं झाड बाबूमहाशय! माझ्या आईनं स्वत: आपल्या हातानं लावलं होतं तें!"

"हातानं लावलेलं म्हणे! पांडे, या बेट्याला धक्का मारून बाहेर काढ पाहूं."

पांड्यानें येऊन त्याला एक धक्का दिला आणि असे कांहीं शब्द उच्चारले, कीं ते जमीदाराच्या शिपायालाच शोभले असते.

आंगावरची धूळ झाडून कंगाल उठून उभा राहिला आणि हळुहळू तिथून चालता झाला. आपला अपराध काय, आपल्याला मार कां खावा लागला, ते कांहीं त्या बिचाऱ्याला कळलें नाहीं.

गुमास्त्याच्या निर्विकार अंत:करणाला एव्हढासुद्धा धक्का लागला नाहीं तसे झालें असतें तर असली नोकरी त्याला कुणी दिलीच नसती. तो म्हणाला, "परेश, पहा तर खरं, या बेट्यानं खंड भरला आहे, कीं काहीं बाकी आहे? शिल्लक असली तर घरांत कांही असेल-नसेल याच्या, ते सारं आणून ठेव. हरामजादा पळून जायचा!"

त्या दिवशीं मुखर्जींच्या घरीं श्राद्धाच्या तयारीची गडबड होती. श्राद्धाला आतां एकच दिवस राहिला होता. स्वर्गवासी झालेल्या गृहिणीच्या नांवाला साजेल अशा थाटानें श्राद्धाची तयारी होत होती. वृद्ध ठाकुरदास स्वत: प्रत्येक गोष्टीकडे लक्ष देत होते.

कंगाल येऊन त्यांच्यासमोर उभा राहिला आणि म्हणाला,

"ठाकूर महाशय, माझी आई आज वारली—"

"कोण रे तूं? काय हवं तुला?"

"मी कंगाल. आई म्हणाली होती, कीं आपल्याला अग्नि द्या—"

"मग दे ना."

कचेरींत घडलेली हकिगत तोंडातोंडीं होतहोत येथपर्यंत येऊन पोंचली होती एकजण म्हणाला, "त्याला झाड हवंय वाटतं–" असे म्हणून त्याने सर्व हकिगत सांगितली.

मुखर्जी आश्चर्यचकित झाले. ते रागारागाने म्हणाले, "ऐका तर खरं. काय हा भलताच हट्ट! मलाच हवीं आहेत लाकडं पुष्कळशीं–हा एव्हढा उद्यांचा दिवस काय तो आहे. परवां कार्य आहे. जा जा. इथं कांहीं व्हायचं नाहीं–काहीं व्हायचं नाही इथ–" असें म्हणून ते चालते झाले.

जवळच बसलेले भट्टाचार्य महाशय सामानाची यादी तयार करीत होते, ते म्हणाले, "तुझ्या जातींत कधीं कुणी मढीं जाळलीयत का रे? जा–एक गवताची पेंडी पेटवून धर तोंडाजवळ आणि दे नदीकाठीं माती!"

मुखर्जी महाशयाचा वडील मुलगा घाईघाईनें तितक्यांतच त्या बाजूनें जात होता तो कान देऊन ऐकून घेऊन म्हणाला. "पाह्यलंत भटजीबुवा, सारेच बेटे आतां भटबामण होऊं पाहाताहेत!" बोलत बोलत तो आपल्या कामाला निघून गेला.

यानंतर कंगालनें कुणाचीही विनवणी केली नाहीं. या घटका दोन घटकांतच जगाची ओळख पटून तो एकदम म्हातारा होऊन गेला होता. याउपर एक शब्दसुद्धां न बोलतां तो आपल्या मृत मातेच्या देहाजवळ येऊन हजर झाला.

नदीच्या कांठाला खड्डा खणून त्यांत अभागीचा देह निजवला गेला. राखालच्या आईनें कंगालच्या हातीं एक गवताची पेंडी देऊन

पेटवली आणि त्याचा हात धरून ती मेलेल्या आईच्या तोंडाला स्पर्श करून फेंकून दिली. त्यानंतर सर्वांनी खड्डयांत माती लोटून कंगालच्या आईच्या अस्तित्त्वाचा शेवटचा पुरावा नाहींसा करून टाकला.

सगळे खाडा बुजवायच्या कामाला लागले होते. मात्र त्याच वेळीं जाळलेल्या गवताच्या· पेंडीच्या धुराची जी लहानशी झुळुक फेरे घेतघेत आकाशाकडे जात होती तिच्याकडे डोळ्याचें पातेंसुद्धां न हालवतां पाहात कंगाल डोळे वर लावून उभा राहिला होता.

---

# टीपा आणि टांचणें

अभागीची कथा अत्यंत हृदयस्पर्शी आहे. ब्राह्मण आणि अस्पृश्य याच्या लोकाचारातील भूमिकेवरून उत्पन्न होणाऱ्या अत्यंत निर्घृण अशा भेदभावाच्या भूमिकेवर ती आधारलेली आहे. या दोन वर्गात आचार-विचाराच्या दृष्टीने जो पंक्ति–प्रपंच निर्दयपणें केला जातो त्याचे सरळ सरळ चित्र या कथेंत रेखाटलें आहे. कलेच्या दृष्टीनें शरद्‌बाबूंची ही कथा अत्यत सरस आहे. चित्र रेखाटताना अस्पृश्याची तरफदारी करून स्पृश्यांवर कोरडे ओढलेले नसले तरी लेखकाचा कल त्या चित्रातील शब्दाच्या नादातून व्यक्त होतो.

**प्रश्नमाला :—**

१ : मुखर्जीच्या वृद्ध स्त्रीच्या अंत्यविधीचें वर्णन करा.

२ : अभागीला ( कंगालच्या आईला ) त्या चितेत कोणतें दृश्य दिसले ? त्याचा तिच्या मनावर काय परिणाम झाला ?

३ : शुद्धीवर आल्यावर अभागीला काय वाटलें ? त्या वेळेस ती आपल्या मुलाला काय म्हणाली ?

४ : अभागीच्या जीवनाची थोडक्यात माहिती द्या.

५ : रोजच्या जीवनात तिला अहोरात्र सलणारे शल्य कोणते होतें ?

६ : आईच्या थोरवीविषयी कंगालला इतराकडून कोणती माहिती मिळाली होती ?

७ : कंगालच्या वाढत्या वयाबरोबर अभागीच्या मनात कोणते विचार येत होते ?

८ : कंगालने आईकडून कोणती कथा ऐकली ? ती ऐकल्यावर त्याच्या बालमनावर कोणते आघात झाले ?

९ : " कंगाल हा अभागीचे सर्वस्व होता " हे दर्शविणारीं वाक्ये कोणतीं ?

१० : आईच्या औषधपाण्याच्या बाबतींत कंगालला कोणता अनुभव आला ?

११ : अभागीनें औषध का घेतलें नाहीं ?

१२ : ती म्हणाली, " तूं जा अन् त्याना सांग, कीं म्हणावं आईला नुसती तुमची पायधूळ हवीय. " या वाक्यावरून अभागीच्या पातिव्रत्त्याची तुम्हास काय कल्पना येते ?

१३ : अभागीच्या दर्शनाने रसिकला काय वाटलें ?

१४ : अभागीच्या अंत्यकाळीं राखालच्या आईनें कोणते उद्गार काढले ?

१५ : रसिक अंगणातील बेलाचे झाड तोडीत असता कोणता प्रकार घडला ?

१६ : त्या प्रकारावरून बंगालमधील जमीनदार आणि त्याचे अधिकारी यांच्या मनोवृत्तीविषयीं तुम्हास काय वाटतें ?

१७ : त्या प्रसंगीचीं अधर बाबूंच्या तोंडचीं कांहीं अ-मानुष वाक्यें द्या.

१८ : अभागीनें प्राण सोडला त्याच दिवशीं मुखर्जीच्या घरीं कसली गडबड चालली होती ?

१९ : गरिबीनें छळलेल्या कंगालनें आपल्या आईचा अंत्यविधि कसा पार पाडला ?

२० : या कथेस ‘ अभागीचा स्वर्ग ’ हें शीर्षक देण्यांत लेखकाचा कोणता हेतु असावा ? तुम्ही दुसरें एखादें नांव सुचवा.

**भाषा सौंदर्य :—**

— सारा संसार उजळ ठेवून झालेलें तें स्वर्गारोहण पाहून तिचे हृदय फुलून फुलून उठूं लागलें. (पृ. ७)

— त्या वाघाची आणखी एक वाघीण होती. (पृ. ९)

— अभागीला वाटत होतें, कीं आतां एकदोन वर्षांत तो आपल्या अभाग्याबरोबर झुंज द्यायला समर्थ होईल आणि आपलें दैन्य दूर होईल. (पृ. ९)

— तिच्या अंगांतला ताप जसजसा वाढूं लागला, गरम झालेलें रक्त जसजसें मस्तकाकडे वाहूं लागलें तसतशा तिला नव्या नव्या कल्पना एकामागून एक सारख्या सुचूं लागल्या. ती नव्यानव्या कथांचें इंद्रजाल रचीत होती. (पृ. १३)

— संध्याकाळची कोवळी साऊट वाढत जाऊन सर्वत्र झांप घालीत होती. (पृ. १३)

— डोळ्यांतली नजर या जगाचें काम संपवून कोणत्यातरी अज्ञात देशाचा प्रवास करण्यासाठीं चालती झाली होती. (पृ. १४)

— मरणाच्या मार्गावर असलेल्या त्या यात्रेकरूनें आपला निर्जीव हात कसाबसा बिछान्याच्या बाहेर सारून पुढें पसरला. (पृ. १८)

— या घटका दोन घटकांतच जगाची ओळख पटून तो एकदम म्हातारा होऊन गेला. (पृ. २४)

———

# हरिलक्ष्मी

या गोष्टीला जे कारण झालं ते लहान असलं तरी ह्या लहानशा कारणांतून हरिलक्ष्मीच्या जीवनावर जो परिणाम झाला तो क्षुद्र नव्हता की तुच्छही नव्हता. जगांत हें असंच होतं.

बेलपूरचे दोघे नावाडी. शांत अशा नदीकिनारीं शांत अशा जहाजाच्याजवळ एक लहानशी होडी अगदीं निरुपद्रवी प्राण्यासारखी बांधून ठेविली होती. कुठून कोण जाणे, एक मोठी वावटळ आली जहाजाची दोरी तुटली, नांगर सुटला. पाहाता पाहातां ती छोटीशी होडी कुठं जाऊन कशी नाहींशी झाली तें कळलं सुद्धां नाही.

बेलपूरची जहागीर तशी फारशी मोठी नव्हती! तसं पाहिलं तर असती नुसती सारी लोकसंख्या हिशेबांत घेतली तर १०–१५ हजारांपेक्षां जास्त झाली नसती. पण साडेपंधरा आण्यांचा भागीदार जो शिवचरण त्याच्याबरोबर दोन पैशाचा भागीदार बिपिनबिहारी याची, तें मोठं जहाज आणि छोटी होडी यांच्याशीं तुलना केली तर अतिशयोक्तीचं माप पदरांत पडायचं नाहीं.

दोघे दूर रहात असले तरी घराणं एक होतं. सात पिढ्यांपूर्वी सारेच एका घरचे होते. पण आज एकाचा तीन मजली वाडा साऱ्या गांवच्या शेंड्याला बसला होता, तर दुसऱ्याचं मोडकं घर रोजच्यारोज जमीनदोस्त व्हायची वाट पहात होतं.

तरीही असेच दिवस जात होते—आणि अशाच प्रकारें बिपिनचे बाकीचे दिवस सुखदु:खाशीं टक्कर देत देत निर्विकार गेले असते. कुठून तरी एक ढग आला, त्या ढगांतून वावटळ आली, आणि त्या वावटळीनं उलटापालट करून टाकली तीही अशाच प्रकारे.

साडेपंधरा आण्याचा भागीदार शिवचरण याची बायको एकाएकी मयत झाली त्यावेळी त्याचे स्नेहीसोबती म्हणाले, "चाळीस पन्नास वर्षं म्हणजे म्हणजे म्हातारपण नव्हे. तूं पुन्हा लग्न कर."

शत्रुपक्षाचे लोक ते ऐकून हसले आणि म्हणाले, "शिवचरणाला चाळीस वर्षं उलटून गेलीं आहेत!"

अर्थात यांतलं काहीच खरं नव्हतं. वस्तुस्थिती होती ती अशी: बडेबाबू चागले गोरेगोमटे होते, शरीरयष्टि चांगली धष्टपुष्ट होती, गुबगुबीत गालांवर केसाची हिरवळ अगदीच तुरळक होती, कित्येक दिवसांत वस्तरा फिरवला नाहीं तरी देखील चाललं असतं. वयाचा अंदाज करायला गेलं, तर कुणी आंकडे घटवायला तयार होत, तर कुणी आंकडे चढवायला. पण ही मजल कुठवर चढवावी हें त्यांनाच ठरवतां येत नसे.

ते कांहीं का असेना; भरपूर पैसा गांठीला असलेल्या पुरुषांचं लग्न व्हायला ज्या कुठल्या देशांत वय आडवं येत असेल तें असो, बंगाल्यांत मात्र ही अडचण केव्हांच येत नाहीं.

रिकामं घर एक दिवशीं सोळा कलांनीं उजळून उठलं. शत्रुपक्ष कांहींही म्हणोत, पण विधाता त्या वेळीं त्याच्यावर प्रसन्न झाला

होता हें कबूल करावं लागेल. ते आपसांत बोलत होते, कीं पात्राचा विचार करतां नवी नवरी वयाच्या दृष्टीनं कांहीं अगदींच अनुरूप नव्हती. एकादं दुसरं मूल घेऊन येण्याइतकं तिचं वय झालं होतं, असं म्हणायला त्यांनीं कमी केलं नाहीं.

तरी पण ती सुंदर होती हें मात्र त्यांना कबूल करावं लागल. वयाच्या हिशेबानं पहायचं म्हणजे वाढलेल्या मुलीपेक्षांही लक्ष्मीचं वय एकंदरींत जास्तच होतं. निदान एकोणीसच्या खालीं खात्रीनं नव्हतं. तिचा बाप सुधारक मताचा होता. मुलीला मुद्दाम शाळेत पाठवून मॅट्रीकची परीक्षा पास होण्यासाठीं त्यानं तिला लग्नाशिवाय ठेवली होती. त्याची आवड होती वेगळीच, पण एकाएकी व्यापारांत ठोकर लागल्यामुळं इच्छेप्रमाणें चांगल्या स्थळीं मुलगी देणं त्याला अशक्य झालं.

लक्ष्मी शहरची मुलगी होती. चारदोन दिवसांत तिनं नवऱ्याला अचूक ओळखलं. नात्यागोत्याचे पुष्कळसे लोक, दासदासी नोकर-चाकर असलेल्या ह्या बड्या मोठ्या घरांत मोकळेपणानं मिळणं मिसळणं शक्य नाहीं, असं दिसून आल्यामुळं तिला मोठा पेंच पडला होता.

इकडे शिवचरणच्या प्रेमाला पारावार राहिला नव्हता. नुसती म्हाताऱ्याची तरुण बायको म्हणून नव्हे, तर त्याला एकदम एक अमोल ठेवा सांपडल्याचा आनंद झाला होता. घरच्या भल्यामोठ्या गोतावळ्याच्या मेळाव्यांत तिला कशा रीतीनं सांभाळून घ्यावं हेंच त्याला कळेनासं झालं होतं. त्याला पुन्हां पुन्हां ऐकूं येई ती एक

गोष्ट—थोरल्या सुनेच्या तोंडाला तिनं काजळ फासलं. रूप म्हणा, गुण म्हणा, शिक्षणाच्या आणि बुद्धीच्या दृष्टीनं देखील हिनं थोरल्या सुनेच्या गर्वाचा पारा खालीं उतरवला.

एव्हढं जरी होतं तरीही व्हावं तसं झालं नाहीं. एक दोन महिन्याच्या आंतच लक्ष्मी आजारी पडली. ती आजारी असतांनाच एक दिवशी थोरली सूनबाई भेटायला आली. बड्या घरची नवी नवरी तापानं आजारी पडली आहे असं ऐकतांच बिपीनची बायको तिला भेटायला आली होती. तिच्यापेक्षां फार तर ती दोन तीन वर्षांनी मोठी असावी. ती सुंदर होती हें लक्ष्मीला सुद्धां मनांतल्या मनांत कबूल करावं लागलं. पण ह्या तरुण वयांत सुद्धां दारिद्र्याचे भयंकर फटके सोसल्याची सारी लक्षणं तिच्याठायीं दिसत होतीं. तिच्याबरोबर सुमारे सहा वर्षांचा तिचा मुलगाही आला होता, तोही अगदीं बाळका होता.

ती येतांच लक्ष्मीनं तिला आग्रहानं बिछान्यावर बसवून घेतलं आणि मुकाट्यानं ती तिच्याकडे सारखी कांहीं वेळ पहात राहिली. हातांतल्या चार दोन सोन्याच्या बांगड्याखेरीज तिच्या अंगावर दुसरा कोणताच दागिना नव्हता. नेसलेली धोतरकांठी साडी मळलेली होती—कदाचित् तें तिच्या नवऱ्याचं धोतरच असावं. खेडेगावच्या पद्धतीप्रमाणें मुलगा अगदींच दिगंबर नव्हता. त्याच्या ढुंगणाभोवतीं लहानसा पंचा गुंडाळलेला होता.

तिचा हात आपल्या हातांत धरीत लक्ष्मी हळूच म्हणाली, "भाग्य माझं, कीं मला ताप आला, म्हणून तरी तुमची भेट झाली. तसं नातं पाह्यचं तर मी तुमची वडील जाऊ. मी ऐकलंय, कीं भाऊजी म्हणे वयानं बरेच लहान आहेत."

जाऊबाई हंसून म्हणाली, "नात्यानं लहान असलेल्या माणसाला कुणी 'तुम्ही' का म्हणतं?"

लक्ष्मी म्हणाली, "पहिलाच दिवस म्हणून मी तसं म्हटलं. नाहीं तर मी कांही अहोजाहो करणारी बायको नाही. तसं पाह्यलं, तर तूं देखील मला 'अक्का' म्हणत जाऊं नकोस—ते मला खपायचं नाही. माझं नांव लक्ष्मी!"

जाऊबाई म्हणाली, "नाव सागायला कशाला हवं? पाहिल्या-बरोबर चट्कन कळतंच. अन् माझं नांव—कोण जाणे कुणी थट्टेनं ठेवलं तें, कमला." असें म्हणून ती मोठ्या कौतुकाने हंसली.

हरिलक्ष्मीला वाटलं होतं आपण सुद्धां तिच्याप्रमाणें म्हणाव, चेहेऱ्याकडे पाहिल्याबरोबर नांव आपोआप कळतं म्हणून. पण अनुकरण केल्याचा आरोप येईल या भीतीनं तिनं तसं म्हटलं नाहीं. ती म्हणाली, "एकूण तुझं—माझं नांव एकच आहे—पण जाऊबाई, मी तुला 'तूं' म्हणतें, पण तुझ्यानं तें कांहीं झालं नाहीं."

जाऊबाई हंसून म्हणाली, "चट्कन कसं यावं तें? एक वय सोडलं तर माझ्यापेक्षां सर्वच बाबतीत तुम्ही मोठ्या. चार दिवस जाऊं देत असेच, जरूर पडली तर बदलायला किती वेळ लागणार?"

यावर काय उत्तर द्यावं तें हरिलक्ष्मीला चटकन सुचेना. तिला एवढें मात्र पटलें, कीं पहिल्याच दिवसाच्या परिचयांत ही बाई फारशी आपुलकी जोडायला तयार नाही. कांहींतरी बोलायचें म्हणून ती बोलणार होती तोंच जाऊबाई उठत उठत म्हणाली, "तर मग येतें आक्का, उद्यां येईन पुंन्हां."

लक्ष्मी अचंबित होऊन म्हणाली, "इतक्यांतच निघालीस म्हणजे काय? बस ना जरा."

जाऊबाई म्हणाली, "तुमचा हुकुम झाला म्हणजे बसायलाच हवं खरं; पण आज मात्र जातें. यांची घरीं यायची वेळ झाली आहे." असें म्हणून ती मुलाचा हात धरून उभी राहिली आणि जायच्यापूर्वीं हंसतमुखानें म्हणाली, "येतें आक्का. उद्यां सकाळींच येईन. कसं?" असें म्हणून ती त्याच पावलीं बाहेर निघाली.

बिपिनची बायको निघून गेल्यावर हरिलक्ष्मी कितीतरी वेळ तिकडेच पाहात पडून राहिली होती. त्यावेळीं तिचा ताप निघाला होता, पण तिला थकवा बराच आला होता, तरीही कांहीं वेळपर्यंत तो सारा थकवा ती विसरून गेली होती. इतक्या दिवसांत गांव-भरच्या सुनालेकी ज्या येऊन गेल्या होत्या त्यांची गणती नव्हती. पण गरिबाघरच्या या बाईबरोबर त्यांतील एकीचीही तुलना करतां आली नसती. त्या ज्या येत होत्या त्या बैठक मारून बंसत, उठून जायची त्यांची इच्छा नसे, आणि बसायला सांगितलं म्हणजे बोला-यलाच नको—किती जणींचा मोठेपणाचा आव, तर किती जणींची

बाष्कळ बडबड—तिला खूष करण्यासाठीं किती जणींचे किती प्रकारानं चाललेले निर्लज्जपणाचे प्रयास तिला आठवत होते. या साऱ्या बोजाखालीं चेंगरून केव्हां केव्हां तिचं मन बंड करायला सरसावे. पण तितक्यांत कुठून तरी ही अचानक आली, तिच्या शेजारी बसली आणि बसल्या बसल्या आपला परिचय करून देऊन दुसऱ्या क्षणाला निघून गेली. तिचं माहेर कुठं तें विचारायला सुद्धां तिनं सवड दिलीं नाहीं.

विचारलं नाही खरं, तरीही लक्ष्मीला कळून चुकलं, कीं ती तिच्यासारखी कांहीं कलकत्त्याची शहरी मुलगी नव्हती. शिकली-सवरलेली म्हणून त्या खेडेगांवांत बिपिनच्या बायकोची थोडीशी प्रख्याति होती. लक्ष्मीला वाटलं, रामायण-महाभारताची पोथी सुरावर वांचण्यापलीकडे तिच्या शिक्षणाची मजल गेलेली नसावी. बिपिन-सारख्या दरिद्री माणसाच्या हातीं मुलगी सोंपविणारा बाप, घरीं मास्तर ठेवून, शिकवून, परीक्षा दिलेल्या मुलीचं कन्यादान करण्या-इतका खात्रीनं समर्थ नसावा.

तिचा वर्ण एकंदरींत सांवळाच होता. तिला कुणी कांहीं गोरी म्हटलं नसत. रूपाची गोष्ट सोडून दिली तरी शिक्षण, संस्कार, गृहस्थिति यांच्या दृष्टीनं बिपिनची बायको कांहीं तिच्या तोलाला आली नसती. पण एका बाबतींत मात्र आपण तिच्या समोर उण्या आहों असं स्वतः लक्ष्मीलासुद्धां वाटलं. तिचा आवाज म्हणजे जसा कांहीं गाण्याचा आवाज शिवाय बोलायची लकब सुद्धां अगदीं गोड गोड—साखरेनें माखलेली. एवढा सुद्धां कृत्रिमपणा नव्हता तिच्या

भाषणांत—जसं कांहीं घराकडून ठरवूनच आली होती आणि अगदीं सहज सहज बोलत होती. पण या सर्वांपेक्षां जी गोष्ट तिला विशेष जाणवली, ती तिनं दाखवलेला दुरावा. आपण गरिबाघरची सून-तेंही ती उघडपणें बोलली नाहीं—तरीही ती तसं जाणवून देत होती-जशी कांहीं तिची ती स्वाभाविक वृत्तीच—जसं कांहीं या गरिबीखेरीज दुसरं कांहींच मानवत नव्हतं तिला.

ती दरिद्री होती, पण कंगाल नव्हती. एका कुटुंबांतील सून दुसऱ्या एका सुनेच्या आजारीपणात चौकशी करायला आली होती, यापेक्षां दुसरा कोणताही उद्देश तिच्या येण्यांत नव्हता हें जाणवून देऊन ती निघून गेली.

संध्याकाळीं नवरा तिच्या खोलींत आला, तेव्हां इकडच्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर हरिलक्ष्मी त्याला म्हणाली, "आज त्या घरची जाऊबाई पाहिली मी."

शिवचरण म्हणाला, "कोण? बिपिनची बायको?"

लक्ष्मी म्हणाली, "हो, आज माझं भाग्य उजळलं. इतक्या दिवसांनीं ती स्वतः मला भेटायला आली. चार-दोन मिनिटांपलीकडे मात्र बसली नाहीं. काम आहे म्हणून निघून गेली."

शिवचरण म्हणाला, "काम? आतां काय सांगायचं! तिच्या घरीं नाहीं गडी कीं नाहीं मोलकरीण. भांडीं घासण्यापासून चुलीवर हंडी चढवण्यापर्यंत सारं कामच काम! तुझ्यासारखी सुस्कारे टाकीत स्वस्थ बसायला तिला कुठं आहे सवड? एक पाण्याचा तांब्यासुद्धां उचलून ठेवावा लागत नाहीं तुला!"

आपल्याबद्दल असे उद्गार काढल्याचं हरिलक्ष्मीला फारच जाणवलं. पण नवरा बोलत होता तो तिला चढवण्यासाठीं- लाजव-ण्यासाठीं नव्हे, हें कळत असल्यामुळं तिला त्याचा राग आला नाहीं. ती म्हणाली, "जाऊबाई म्हणे मोठी मानी आहे. घर सोडून कुठं जात नाहीं म्हणे!"

शिवचरण म्हणाला, "जाणार कशी? हातांतल्या चार बांगड्यां-खेरीज एक तनसडी देखील नाहीं अंगावर, म्हणूनच शरमून तोंड लपवून राहते."

हरिलक्ष्मी थोडीशी हंसत म्हणाली, "शरम कसली त्यांत? गांवचीं लोकं काय तिच्या अंगावरचे दागिने बघण्यासाठीं तळमळताहेत? कीं ते दिसले नाहींत तर छीथू करणार आहेत?"

शिवचरण म्हणाला, "अंगावरचे दागिने होय? मी जे दागिने तुला दिले आहेत, तसले दागिने कुणाच्या डोळ्यानं कधीं पाहिले तरी आहेत का? प्रत्यक्ष बायकोला आजपर्यंत दोन जोड बांगड्या देण्यापलीकडे कांहींच देतां देऊं नये! हा पैशांचा जोर बरं—पैशांचा जोर! मोठा जबरदस्त असतो हा जोर! दोन पैजारा मारीन अन्—"

हरिलक्ष्मी तें ऐकून अत्यंत शरमली आणि मधेंच म्हणाली, "छे छे! हें काय बोलतां तुम्ही?"

शिवचरण म्हणाला, "नाहीं नाहीं. माझ्याकडे तसं मागंपुढं कांहीं नाहीं. जें बोलायचं तें अगदी उघडउघड बोलत असतों मी."

यावर कांहीं सुद्धां उत्तर न देतां हरिलक्ष्मी डोळे मिटून स्वस्थ पडून राहिली. आणि बोलायला तरी काय आधार होता? दुबळ्या

माणसाच्या विरुद्ध कठोर आणि कर्णकटु भाषा वापरणं म्हणजे या लोकांना तो स्पष्टवादीपणा आहे असं वाटतं! शिवचरण मात्र थांबला नाहीं. तो तसाच बोलत होता, "लग्नाच्या वेळीं ५०० रुपये कर्जाऊ म्हणून घेऊन गेला. व्याजमुद्दल मिळून आज सातआठशें झाले आहेत, त्याची आठवण आहे का? गरीब माणसांनीं खालीं मान घालून एका बाजूला राहावं—मनांत आणलं तर कान पिळून हांकलून देतां येईल त्याला! मोलकरणीची देखील लायकी नाहीं अन् माझ्या बायकोपाशीं मिजास मिरवते का?"

हरिलक्ष्मी या कुशीवरून त्या कुशीवर वळली. आधींच आजारी, त्यांतून हे अशा प्रकारचे उद्‌गार ऐकूं आल्यामुळं शरमेनं तिच्या सर्वांगाला झिणझिण्या उठल्या होत्या.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं खोलींत कुणाची तरी चाहूल लागल्या-मुळं हरिलक्ष्मीनं डोळे उघडून पाहिलं, तो तिला बिपिनची बायको बाहेर जात असलेली दिसली. तिला हांक मारून ती म्हणाली, "हें काय? निघालीसशी?" ती शरमून मागें फिरली आणि म्हणाली, "मला वाटलं कीं तुम्हाला झोंप लागली. आज प्रकृति कशी काय आहे आक्का?"

हरिलक्ष्मी म्हणाली, "आज पुष्कळसं बरं वाटतंय. हें काय? मुलगा आणला नाहींस कुठं तो?"

जाऊबाई म्हणाली, "आज तो अवेळींच झोंपी गेला आक्का."

"झोंपी गेला म्हणजे काय?"

"अभ्यासाला अडथळा होऊं नये म्हणून मी त्याला दिवसा झोंपूं देत नाहीं!"

हरिलक्ष्मीनं विचारलं, "दुपारच्या वेळीं उन्हातानांत दांडगाई करीत हिंडत नाहीं का तो?"

जाऊबाई म्हणाली, "हिंडतो तर! पण असं अवेळीं झोपण्यापेक्षां दंगा करणं बरं."

"तूं स्वतः अशी कधीं झोंपत नाहींस वाटतं?"

जाऊबाई हंसली आणि मान हलवून म्हणाली, "नाहीं."

स्त्रीजातीच्या स्वभावाला अनुसरून फुरसत न मिळण्याच्या हजार कारणांची यादी ती देऊं लागेल असं लक्ष्मीला वाटलं होतं, पण तसं कांहीं झालं नाहीं.

त्यानंतर त्या दोघींच्या गप्पाटप्पा सुरू झाल्या. बोलतां बोलतां हरिलक्ष्मीनं आपल्या माहेरच्या गोष्टी, बहिणभावंडांच्या गोष्टी, शिकवणीला येणाऱ्या मास्तरांच्या, शाळेच्या, इतकंच काय, मॅट्रिकची परीक्षा पास होण्याबद्दलच्या गोष्टीसुद्धां सांगून टाकल्या.

बऱ्याच वेळानं ती भानावर आली त्यावेळीं तिला सरळसरळ दिसून आलं, कीं श्रोता या नात्यानं जाऊबाई कितीही उदार असली तरी वक्ता या नात्यानं ती चांगलीच कंजुष होती. स्वतःची हकीगत तिनं सहसा कांहींच सांगितली नाहीं. पहिल्यानं लक्ष्मी जरा ओशाळली, पण लगेच तिला वाटलं, कीं आपल्यासमोर सांगण्या-सारखं तिच्या हिशेबीं होतं तरी काय? आदल्या दिवशीं या बाईबद्दल तिचं मन अप्रसन्न झालं होतं. आज तिच्याबद्दल तितकंच जास्त समाधान वाटलं.

भिंतीवरच्या बहुमोल घड्याळांत बऱ्याचशा वाद्यांच्या आवाजानंतर तीन वाजले. जाऊबाई उठून उभी राहिली आणि

अदबीने म्हणाली, " तर मग आज आतां येऊं का आक्का ? "

लक्ष्मीनं कौतुकानं विचारलं, " तीन वाजतोंपर्यंत तुला सुट्टी असते वाटतं ? अगदीं काट्याला काटा जुळवून घड्याळ पाहून घरीं येतात का भाऊजी ? "

जाऊबाई म्हणाली, " आज ते घरींच आहेत. "

" तर मग आज बैस ना थोडा वेळ."

जाऊबाई बसली नाहीं—पण जाण्यासाठी तिनं पाऊलही पुढं टाकलं नाही. ती शांतपणे म्हणाली, " आक्का, तुम्हीं चांगल्या शिकल्यासवरलेल्या. पुष्कळसं लिहिणंवाचणं झालेलं. आम्ही खेडेगांवी माणसं — "

" तुझं माहेर देखील खेडेगावांतच आहे वाटतं ? "

" होय आक्का, अगदीं खेडवळ गांव आहे तें. काल एक बोलायचं असताना नकळत भलतंच तोंडून गेलं माझ्या; पण तुमचा अपमान करावा म्हणून नव्हे— तुम्ही सांगाल ती शपथ घेते आक्का. "

हरिलक्ष्मी आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " हें काय म्हणतेस जाऊबाई ? असलं कांहींच बोलली नव्हतीस तूं. "

जाऊबाई यावर उत्तरादाखल एक शब्दही बोलली नाहीं. पण 'येतें' म्हणून पुन्हां निरोप घेऊन ज्यावेळीं ती संथपणें निघून गेली त्यावेळीं तिचा आवाज अकस्मात भरून आल्यासारखा वाटला.

रात्रीं शिवचरण जेव्हां आला त्यावेळीं हरिलक्ष्मी मुकाट्यानं झोंपली होती. जाऊबाईचे जातांवेळचे शब्द त्यावेळीं तिच्या ध्यानांत

नव्हते. तिची प्रकृती चांगलीच सुस्थ होती. मन अगदीं शांत आणि प्रसन्न होतं.

शिवचरणनं विचारलं, " कशी काय आहे तब्येत? "

लक्ष्मी उठून बसली आणि म्हणाली, " बरी आहे. "

शिवचरण म्हणाला, "सकाळची हकीगत कळली तुला? बेट्याला बोलावून आणून सर्वांच्यासमोर असा सज्जड खडसावला, कीं जन्माची याद राहील. मी बेलापूरचा शिवचरण आहे म्हणावं! हो."

हरिलक्ष्मी घाबरून म्हणाली, "कुणाला हो?"

शिवचरण म्हणाला, " बिपन्याला. त्याला बोलावून आणला आणि सांगितलं, तुझ्या बायकोनं माझ्या बायकोसमोर मिजास दाखवून जो अपमान केला, ती एवढी तालेवारी कुठली आली ही तिला? पाजी–हरामखोर–हलकटाची पोरटी! उघड्या डोक्यावर ताक ओतून गाढवावरून धिंड काढून गांवाबाहेर घालवून देईन तें माहित आहे?"

आधींच आजारीपणानं कोमेजलेला हरिलक्ष्मीचा चेहेरा पांढरा फटक पडला. ती म्हणाली, " म्हणतां काय?"

छातीवर हात मारून शिवचरण मोठ्या दिमाखानं म्हणाला, "या गांवांत जज्ज म्हण, मॅजिस्ट्रेट म्हण, कोतवाल, फौजदार कुणीही म्हण, हा शर्मा आहे एकीं एक! हाच शर्मा! मरणकाठी, जीवनकांठी साऱ्या या माझ्या हातीं आहेत! तूं नुसती बोल, उद्यां बिपिनची बायको येऊन तुझ्या पायांवर लोटांगण घालूं लागली; नाहीं तर लाटू चौधरीचा बच्चाच नव्हे मी!"

सर्वांसमक्ष बिपिनच्या बायकोची अब्रू घेण्याची हकिगत यथातथ्य सांगतांना लाटू चौधरीच्या बच्चानें वाटेल ते भलेबुरे शब्द वापरायला मुळींच मागंपुढं पाहिलं नाहीं. त्याच्या समक्ष स्तब्धपणें, डोळ्याचं पात सुद्धां न हालवतां, ती हकिगत ऐकतांना हरिलक्ष्मीला वाटूं लागलं, धरणीमाते दुभंग हो!

दुसरेपणाच्या तरुण पत्नीच्या देहरक्षणासाठी शिवचरण स्वतःच्या देहाखेरीज वाटेल त्याचा त्याग करायला तयार होता. हरिलक्ष्मीचा तो असला देह बेलपुरांत राहून बरा व्हायला तयार होईना. डॉक्टरनीं सल्ला दिला हवा बदलायचा. साडेपंधरा आणे उठाठेव करून शिवचरणानें मोठ्या थाटांत हवा बदलायचा समारंभ करण्याचा बेत केला. निघायच्या दिवशीं गांवांतले सारे लोक निरोप द्यायला हजर राहिले होते. आलीं नाहींत काय ती बिपिन आणि त्याची बायको. बाहेर शिवचरण तोंडाला येईल तें बोलत होता, तर घरांत आत्याबाई सैतानासारखी पिसाळली होती. या आगीवर फुंकर घालायला बाहेर सुद्धां कांहीं कमी लोकांचा अभाव नव्हता. घरांत देखील आत्याबाईच्या आरडाओरडीला जोर द्यायला भरपूर बायका मंडळी गोळा झाली होती.

कांहींच बोलत नव्हती काय ती हरिलक्ष्मी. जाऊबाईवर इतर लोकांइतकाच तिचा राग झाला होता. तिला वाटत होतं, की आपल्या जंगली नवऱ्यानें किती का अन्याय केलेला असेना, आपण तर कांहीं केलं नव्हतं? तरीही घरांत आणि घराबाहेर ज्या बायका आरडाओरड करीत होत्या त्यांच्या सुरावर सूर देणं तिला कांहीं उचित वाटलं नाहीं. त्या बायकांचा तिला तिटकाराच आला होता.

विपिनचं घर लागलं तेंव्हां मेण्याचा दरवाजा किलकिला करून तिनं उघडून पाहिलं, त्यावेळीं त्या घराच्या आजूबाजूला कुणाची सावली देखील दिसली नाहीं.

काशींत राहायला एक प्रशस्त घर भाड्याने घेतले होते. तिथल्या हवापाण्याचा परिणाम होऊन लक्ष्मीची प्रकृति दुरुस्त व्हायला फारसा विलंब लागला नाहीं. तीन चार महिन्यांनी ती जेंव्हां परत घरीं आली तेंव्हां तिची अंगकांती पाहून शेजारपाजारच्या बायकांना तिचा हेवा वाटू लागला, इतकी तिची प्रकृति उत्तम झाली होती.

थंडीचे दिवस जवळ आले होते. दुपारच्या वेळी जाऊबाई अंथरूण धरून पडलेल्या आपल्या नवऱ्यासाठी लोकरीचा गळपट्टा विणीत बसली होती. जवळच तिचा मुलगा खेळत होता. तो खेळतां खेळतां थांबून मधेच ओरडला, "आई, काकू!"

हातचें काम बाजूला फेंकून ती घाईघाईने उठली आणि एक नमस्कार करून तिला बसण्यासाठीं तिनें आसन अंथरलें. तिनें हंसत हंसत विचारलं, "आतां प्रकृती साफ बरी आहे ना आक्का?"

लक्ष्मी म्हणाली, "हो. आतां साफ बरी झाल्येय. पण कुणी सांगावं कदाचित् बरीसुद्धा झाली नसतें—कदाचित् परत घरींसुद्धां आलें नसतें—पण जायच्यावेळीं एका शब्दानं माझी चौकशी सुद्धां केली नाहींस! जात असतांना वाटेंत तुझ्या घराच्या खिडकीकडे पहात पहात गेलें पण कुणाची साऊट सुद्धां दिसली नाहीं. आजारी बहीण जायला निघालेली, तिची एवढीसुद्धां माया वाटली नाहीं का जाऊबाई? अशी कशी ग निर्दय बनलीस?"

जाऊबाईच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या, पण तोंडावाटे तिनं एक शब्दसुद्धा बाहेर काढला नाहीं.

लक्ष्मी म्हणाली, “ माझ्या अंगीं इतर कोणताही दोष असो, पण तुझ्यासारखं माझं अंतःकरण दगडधोंड्याचं नाहीं. ईश्वर करो आणि तसं न होवो, पण माझ्याजागीं तूं असतीस तर अशा वेळीं मी तुला भेटायला आल्यावांचून मुळींच राहिलें नसतें. ”

जाऊबाईनं या आरोपालाही कांही उत्तर दिलं नाहीं. ती मुकाट्यानं उभी राहिली होती.

लक्ष्मी यापूर्वी त्या घरांत कधी आली नव्हती. आज पहिल्यानच तिनं या घरांत पाऊल टाकलं होतं. ती या खोलींतून त्या खोलींत फिरत घर पाहून घेऊं लागली. शंभर वर्षं उमरीचं ते थकलभागलेल घर—त्यांतल्या तिनच खोल्या काय त्या कशाबशा माणसाला राहाण्याजोग्या होत्या. गरिबाचं घरटं, आंत सामानसुमान कांहीं नव्हतंच म्हटलं तरी चालेल. भिंतींचा गिलावा निखळून पडलेला—दुरुस्त करायला सामर्थ्य होतं कुणाला? तरीपण कुठंही एवढीसुद्धां अस्वच्छता नव्हती. पातळशीच बिछान्याची लेपटी-पण ती कशी स्वच्छ ठेवलेली होती. भिंतीला देवदेवतांच्या चार तसबिरी टांगलेल्या होत्या. तिथ आणखीं होत्या त्या जाऊबाईच्या हातच्या कशिदाकामाच्या चौकटी. बऱ्याचशा लोकरीच्या, तर कांहीं सुती होत्या. शिकाऊ माणसाच्या हातच्या लाल चोंचीच्या हिरव्या पोपटाचीं किंवा पांच रंगी मांजरांचीं तीं चित्रणं नव्हतीं. मोलवान फ्रेमी घातलेलीं—लाल, निळा, बैंगणी, करड्या, पांढऱ्या अशा नानाविध

रंगाच्या लोंकरींनीं विणलेली 'वेलकम' 'यावें, बसावें' किंवा गीतेंतले श्लोकार्ध असलेलीं तीं कलाकुसरीचीं कामे होतीं.

लक्ष्मीनं अचंबित होऊन विचारलं, "ती कुणाची छबी ग, जाऊबाई? पाहिल्या पाहिल्यासारखी वाटते."

जाऊबाई लाजली, पण हंसून म्हणाली, "टिळक महाराजांची तसबीर घेऊन तशी विणायचा प्रयत्न करीत होतं आक्का, पण तें नीटसं जमलं नाहीं—" असं म्हणून समोरच्या भिंतीला टांगलेली भारतवर्षाचे कौस्तुभ महावीर टिळक यांची तसबीर तिनं बोटानं दाखवली.

लक्ष्मी बराच वेळपर्यंत त्या तसबिरीकडे पहात राहिली होती. ती हळूच म्हणाली, "ओळखलं नाहीं हा दोष माझा बरं जाऊबाई, तुझा नव्हे. मला शिकवशील का ही कला? ही विद्या मला शिकव-लीस तर मोठ्या आनंदानें तुला गुरु म्हणून तुझा गंडा बांधीन."

जाऊबाई हंसूं लागली.

त्या दिवशीं लक्ष्मी तीनचार तासांनीं परत गेली त्यावेळीं दुसऱ्या दिवसापासून ही कला शिकण्यासाठीं रोज जाऊबाईकडे येण्याचं तिनं ठरवलं होतं.

ठरल्याप्रमाणें ती येऊंही लागली, पण दहा पंधरा दिवसांत तिला कळून चुकलं, कीं ही कला नुसती कठीणच नव्हे, तर ती हस्तगत करायला कितीतरी कालावधि लागेल.

एके दिवशीं लक्ष्मी म्हणाली, "हें ग काय? तूं मला शिकवीतच नाहींस मुळीं जाऊबाई."

जाऊबाई म्हणाली, "फार दिवस लागतात ते शिकायला. त्यापेक्षां तुम्ही दुसरं कांहीतरी करायला शिका."

लक्ष्मीला मनांतल्या मनात राग आला होता, पण तो बाहेर दिसूं न देतां तिनं विचारलं, "हे शिकायला तुला किती दिवस लागले जाऊबाई?"

जाऊबाईनं उत्तर दिलं, "मला कुणी शिकवलं नाहीं आक्का. मी स्वतःच आपल्या परीनं प्रयत्न करीत करीत—"

लक्ष्मी म्हणाली, "तरीच! दुसऱ्याकडे शिकायचं म्हणजे तुला देखील किती दिवस लागले असते त्याचा हिशेब ठेवता आला असता."

तोंडचे उद्‌गार कसेही असोत, मनांतल्या मनांत तिला पटलं होतं, कीं बुद्धीच्या तुलनेनं आपण जाऊबाईच्या तोडीला उभे रहायला पात्र नाहीं. आज शिकण्याकडे तिचं लक्ष लागत नव्हतं. नित्याच्या जायच्या वेळापूर्वी सूत, सुया आणि नमुने गुंडाळून घेऊन ती घरी निघून गेली.

दुसऱ्या दिवशीं ती आली नाहीं. नित्याच्या क्रमांत हा पहिलाच खंड पडला होता.

तीनचार दिवसानंतर एके दिवशीं हरिलक्ष्मी कशिद्याची पेटी हातीं घेऊन पुन्हां जाऊबाईच्या घरीं हजर झाली, त्यावेळीं जाऊबाई मुलाला रामायणांतील चित्रं दाखवून त्यांतल्या गोष्टी सांगत होती. ती आलेली पहातांच तिनं घाईघाईनं उठून आसन आंथरलं आणि उद्विग्नपणें विचारलं, "दोनतीन दिवस आलां नाहींत त्या? काय प्रकृती बरी नव्हती म्हणून?"

लक्ष्मी गंभीर होऊन म्हणाली, "नाहीं. असंच आणखीं पांच सहा दिवस येतां यायचं नाहीं."

जाऊबाई आश्चर्यचकित होऊन म्हणाली, "पांचसहा दिवस येतां कां नाहीं यायचं? बरं तर. कांही हरकत नाहीं. मग आजच दोन तास अधिक बसून भरपाई करून घेऊं बुडाल्या दिवसाची."

लक्ष्मी म्हणाली, "हां! पण माझी प्रकृती बरी नव्हती असं जर तुला वाटलं होतं, तर जाऊबाई, एकदां येऊन तूं माझी खबर घ्यायला हवी होतीस!"

जाऊबाई शरमून म्हणाली, "आलं पाहिजे होतं खरं, पण संसारांतलीं कितीतरी प्रकारचीं कितीतरी कामं–मी एकटी माणूस–पाठवीन म्हटलं तर पाठवूं कुणाला? चूक झाली खरी. ती मी कबूल करते."

लक्ष्मी मनांतल्या मनांत खूष झाली. इतके दिवस ती आली नव्हती ती अभिमानाच्या भरीला पडून. जाईन म्हणतां म्हणतां दिवसावर दिवस गेले. एका या जाऊबाई खेरीज नुसत्या या घरांतच काय पण साऱ्या गांवांतसुद्धा असं एकही माणूस नव्हतं, कीं ज्याच्याबरोबर तिला खुल्या मनानं मिसळतां आलं असतं.

मुलगा आपल्या रंगात चित्रं पहात होता. त्याला हांक मारून हरिलक्ष्मी म्हणाली, "निखिल, जरा इकडे ये ना बाबा!–" तो जवळ आला तेव्हा लक्ष्मीनं हातपेटी उघडली आणि एक सोन्याची एकसरी त्याच्या गळयांत घातली. ती म्हणाली, "जा आतां खेळायला."

आईची मुद्रा गंभीर झाली. तिनं विचारलं, "ही तुम्ही दिली का त्याला?"

लक्ष्मी हंसत हंसत म्हणाली, "दिलीच तर काय?"

जाऊबाई म्हणाली, "तुम्ही दिली खरी, पण त्यानं घ्यावी कां!"

लक्ष्मी ओशाळल्यासारखी झाली. ती म्हणाली, "काकूनं पुतण्याला एव्हढं सुद्धां देऊं नये का?"

जाऊबाई म्हणाली, "ते मला माहीत नाही आक्का. मला वाटतं तें एवढंच, कीं मी आई असून मला कांहींच देता येत नाही त्याला. निखिल, ती माळ काढून काकूला परत दे पाहूं. आम्ही गरीब आहोत आक्का, पण भिकारी नव्हे. एकादी किंमती वस्तु अचानक मिळाली म्हणून चटूकन दोन हात पसरून पुढ होऊं, असं समजूं नका."

लक्ष्मी स्तब्ध बसून राहिली. यावेळीं सुद्धां तिच्या मनांत उद्‌गार आला, "धरणीमाते, दुभंग हो!"

निघून जायच्या वेळीं ती म्हणाली, "पण ही गोष्ट तुमच्या दीराच्या कानीं जाणार आहे, जाऊबाई."

जाऊबाई म्हणाली, "त्यांच्या पुष्कळच गोष्टी आमच्या कानीं येतात. आमची एकादी गोष्ट त्यांच्या कानावर गेली तर त्यांचे कान कांहीं बाटायचे नाहींत."

लक्ष्मी म्हणाली, "–ठीक आहे, आता पाहूंच त्याची कसोटी." क्षणभर थांबून ती म्हणाली, "निष्कारण माझा असा अपमान करायची जरुरी नव्हती जाऊबाई! अद्दल कशी घडवायची ते मला देखील चांगलं कळतं."

जाऊबाई म्हणाली, "ही रागाची भाषा आहे तुमची. मी तुमचा अपमान केला नाहीं. माझ्या नवऱ्यानं निष्कारण तुमचा अपमान करावा असं होऊं नये, एव्हढंच मी टाळलं. एव्हढं कळण्याइतकं शिक्षण मिळालंय तुम्हांला."

लक्ष्मी म्हणाली, "मिळालय खरं! पण तुमच्यासारख्या खेडवळ बायकोशीं हुज्जत घालण्याइतकं शिक्षण कांहीं मला मिळालेले नाहीं."

त्या कडव्या सवालाला तिनें कांहीं जबाब दिला नाहीं. ती मुकाट्यानं उभी राहिली होती.

जायला निघत असता लक्ष्मी म्हणाली, "या माळेची किंमत कितीही असो, ती मी दिली होती ती त्या मुलाच्या मायेसाठीं. तुझ्या नवऱ्याची अडचण दूर करण्यासाठीं नव्हे. जाऊबाई, श्रीमंत माणसं नुसता गरिबाचा अपमान करीत राहतात एव्हढंच तुला पटलंय—त्यांच्या मनांत सुद्धां मायाममता असते, हे कुणी तुला शिकवलं नाहीं. तेव्हढं शिकवलं पाहिजे कुणीतरी!- तेव्हां मात्र हातींपायीं पडायला येऊं नकोस!"

उत्तरादाखल जाऊबाई गालांतल्या गालांत हंसली आणि म्हणाली, "नाहीं आक्का, ती काळजी करूं नकोस तूं."

नदीचें पाणी वाहूं लागलें कीं बांधाची माती थोडी थोडी ढासळूं लागते. त्या थोड्याशा सुरवातीमधूनच थोड्याच वेळांत वाढत्या पाण्याच्या जोरासरशीं सारा बांध कसा कोसळून पडेल, कसा अनर्थ होईल, याची कल्पना कुणाला आधीं येत नाहीं.

हरिलक्ष्मीच्या बाबतींत अगदीं तसेंच झालें. बिपिन आणि त्याची बायको यांच्या विरुद्ध नवऱ्याकडे तक्रार करण्याचें तिचें भाषण

सपले, त्यावेळीं त्याचा परिणाम काय होईल, याची कल्पना येऊन ती घाबरीघुबरी झाली. खोटे बोलायची तिला संवय नव्हती. आपल्या दर्जाला आणि शिक्षणाला खोटे बोलणे शोभत नाहीं हें तिला माहित होतें--पण पाण्याच्या बेफाम लोंढ्याप्रमाणें अगदीं न कळत ओघासरशीं ज्या एक एक गोष्टी तिच्या तोंडून बाहेर आल्या त्या साऱ्याच कांहीं खऱ्या नव्हत्या, हे तिचे तिलाच आठवलें. पण तो बोलण्याचा ओघ आपल्या शक्तीबाहेरचा होता, त्याचा अनुभव तिला आल्यावाचून राहिला नाही. अजूनपर्यंत एकच गोष्ट तिला चांगलीशी कळून आली नव्हती, ती म्हणजे तिच्या नवऱ्याचा स्वभाव. तो अंतःकरणाने जितका निर्दय होता तितकीच त्याची सूडाची प्रकृति भयंकर होती, आणि वृत्तीही तितकीच जंगली होती. कुणाचाही छळ करायला कांहीं सीमा असते हे जणूं कांहीं त्याच्या खिजगणतींतच नसे. आज त्याने आरडाओरड मुळीच केली नाहीं. सारं कांहीं ऐकून घेतल्यावर तो म्हणाला, "ठीक आहे. सहा महिन्यांत गंमत पहा. एक वर्ष सुद्धां उलटूं देणार नाहीं."

अपमानाच्या जाणिवेनं हरिलक्ष्मीच्या अंतःकरणांत आग भडकली होती. बिपिनच्या बायकोला चांगलीच अद्दल घडावी असं खरोखरच वाटलं होतं; पण शिवचरण बाहेर निघून गेल्यावर त्याच्या तोंडून निघालेलीं तीं दोन साधींशींच वाक्यं लक्ष्मी आपल्या मनांत घोळवून पाहूं लागली त्यावेळीं तिची तीच अस्वस्थ झाली. कुठंतरी, कांहींतरी, चांगलंच बिघडलं आहे असं तिला जाणवूं लागलं.

कांहीं दिवसांनंतर एके दिवशीं बोलतां बोलतां तिनें आपल्या नवऱ्याला हंसत हंसत विचारलं, "कांहीं केलंत का त्यांच्या बाबत पुढं?"

" कुणाच्या बाबतींत ? "

" बिपिनभाऊजींच्या बाबतीत. "

शिवचरण निस्पृहपणाचा आव आणून म्हणाला, " काय करायचं ? आणि असं मला तरी काय करता येणार आहे ? मी एक सामान्य व्यक्ती, यापेक्षां तर कुणी जास्त नव्हे ! "

हरिलक्ष्मी उद्विग्न होऊन म्हणाली, " या बोलण्याचा अर्थ काय ? "

शिवचरण म्हणाला, " वहिनी म्हणतेच की नाहीं, इथं राजवट आहे ती कांहीं मोठ्या भाऊजींची नव्हे--राजवट आहे इंग्रज सरकारची--"

हरिलक्ष्मी म्हणाली, " अस म्हणते का ती ? पण--ठीक आहे--"

" काय ठीक आहे ? "

तिनं थोडासा संशय दाखवून म्हटलं, " पण जाऊबाई कधी असलं कांहींतरी अवास्तव बोलत नसेत. अगदी धूर्त आहे की नाहीं ती ! कुणीतरी एकाचे दोन करून सांगितलं असेल तुम्हाला. "

शिवचरण म्हणाला, " त्यात कांहीं आश्चर्य नाहीं. तरीपण मी जें हें सांगतों आहें ते मी माझ्या कानानं ऐकल आहे. "

हरिलक्ष्मीला तें पटलं नाही. तेव्हढ्या वेळापुरते नवऱ्याचे मन राखण्यासाठीं रागाचा आव आणून ती म्हणाली, " म्हणतां काय ? एव्हढा मोठा अहंकार अं ! वाटेल तें मला बोलते---पण दीर म्हणून थोडाबहुत मान राखला पाहिजे होता तिनं तुमचा."

शिवचरण म्हणाला, " हिंदूच्या घरचीं कुठलीही चार माणसं असंच म्हणतील. शिकलीसवरलेली विद्वान बाई आहे ना ती ! तरी पण कुणी माझा अपमान केला तर त्याची सुटका होईल, पण तुझा

अपमान करणाऱ्याची धडगत नाहीं म्हणावं! कचेरींत जरा जरुरीचं काम आहे म्हणून मी जातो–" असं म्हणून शिवचरण बाहेर निघून गेला.

हरिलक्ष्मीची इच्छा होती एक, पण झालं भलतंच. इतकंच नव्हे, तर तिच्या अंदाजाच्या अगदी उलट झालं. नवरा निघून गेल्यानंतर पुन्हां पुन्हां हेच विचार तिच्या मनांत येत होते.

कचेरींत जातांच शिवचरणनें बिपिनला बोलावून आणलं आणि म्हटलं, "आज पाचसात वर्षं झालीं–सारखं तुला सांगतोय बिपिन, तुझा तो गोठा आधीं काढून टाक. माझ्या शेजघरांत बसणं अशक्य झालंय मला. माझं कांहीं ऐकायचं नाहीं असंच का तूं ठरवून टाकलंयस?"

आश्चर्यचकित होऊन बिपिन म्हणाला, "कुठं सांगितलं मला? असं कांहीं सांगितल्याचं निदान मला तरी आठवत नाही!"

शिवचरण अगदीं सहजासहजी म्हणाला, "निदान दहावेळां तरी मी स्वतः सांगितलंय तुला! तुझ्या आठवणींत नाही राहिलं तर कांहीं मोठंसं बिघडत नाही.–पण ज्याला एव्हढी मोठी जमीदारी चालवायचीय, त्याला असल्या गोष्टी विसरून भागायचं नाही. ते कांहीं का असेना, दुसऱ्याच्या जागेत आपला गोठा बांधून निभायचं नाहीं, एव्हढं कळण्याइतकी तुला स्वतःला तरी अक्कल होती ना? उद्यांच्या उद्यां तो काढून टाक. यापुढं मी ऐकून घेणार नाहीं. शेवटचं सांगतोंय तुला."

बिपिनच्या तोंडांतून एक शब्द देखील बाहेर निघेना. अगदीं एकाएकीं असा विलक्षण प्रस्ताव केलेला ऐकून तो सुन्न होऊन

गेला होता. आजोबाच्या अमदानीपासून जो गोटा आपला आहे असं तो जाणत होता तो आतां आपला नसून दुसऱ्याचा आहे असं धडधडीत खोट विधान ऐकतांच त्याला विरोध करायचं सुद्धा त्याच्याच्यानं झालं नाहीं. मुकाट्यानं तो घरीं निघून आला.

ती हकिगत ऐकून त्याची बायको म्हणाली, "पण राजाची अदालत तर मोकळी आहे?"

बिपिन उगीच राहिला.

तो कितीही भोळा असला तरी त्याला हे पक्कं माहित होतं, कीं इंग्रज सरकारच्या अदालतीचा दरवाजा खुला असला तरी दरिद्री माणसाचा त्यांतून आंत प्रवेश होणं मुष्किलीच होतं.

आणि शेवटीं झालंही तसच. दुसऱ्या दिवशी बड्याबाबूची माणस येऊन त्यांनीं तो जुना गोटा कोसळून टाकला आणि तिथे लांबच लांब भिंत उभारली. बिपिननं जाऊन ठाण्यावर खबर दिली; पण आश्चर्याची गोष्ट ही, कीं शिवचरणाच्या जुन्या विटांची नवी भिंत उभारून पुरी होईपर्यंत कुठलीही रंगीत पगडी त्या बाजूला फिरकली सुद्धां नाहीं. बिपिनच्या बायकोने कोर्टांत फिर्याद माडण्यासाठीं हातींच्या बांगड्या विकल्या. बांगड्या तेव्हढ्या गेल्या, पण हातीं कांहींच आलं नाहीं.

बिपिनची एक दूरची आत्या होती ती मुद्दाम सांगायला आली होती आणि म्हणाली होती, कीं बिपिनच्या बायकोनं हरिलक्ष्मीकडे जाऊन दाद मागून पहावी. तिला तिनं उत्तर दिलं होतं, "वाघाच्या समोर जाऊन हात जोडण्यांत काय अर्थ आहे आत्याबाई? प्राण जायचे ते जातील—वर नुसता अपमान तेव्हढाच पदरात पडेल."

ही हकिगत हरिलक्ष्मीच्या कानी गेली. ती ऐकून ती उगीच राहिली. एका शब्दानं सुद्धा तिनं यावर उत्तर दिलें नाहीं.

काशीहून परत फिरल्यानंतरही तिची प्रकृति तितकीशी बरी राहिली नव्हती. ही गोष्ट घडल्यानंतर सुमारें एक महिन्याच्या आंतच तिला पुन्हा ताप येऊं लागला. काहीं दिवस गांवचींच औषधे चालू होती. जेव्हां त्यांचा उपयोग होईना तेव्हां डॉक्टरच्या सल्लयानुसार हवापालट करण्यासाठीं तिला बाहेरगांवीं जावं लागलं.

बरीचशीं महत्वाचीं कामं असल्यामुळं यावेळीं शिवचरणला तिच्याबरोबर जातां आलें नाहीं. तो गांवीच राहिला. जातांना नवऱ्याला एक गोष्ट सागण्यासाठीं तिचा जीव वरखालीं होत होता. पण त्याकरितां त्या माणसासमोर कांही केल्या तिला तोंड उघडणं अशक्य झालं. तिला पुन्हां हेच वाटूं लागलं, कीं ते सांगण्यात कांहीं अर्थ नाहीं—त्याचा अर्थ त्याला कळायचा नाहीं.

हरिलक्ष्मीचा आजार बरा होऊन तिची प्रकृति पूर्णपणे बरी व्हायला या खेपेला थोडा जास्त कालावधि लागला. जवळजवळ एक वर्षानंतर ती परत बेलपूरला आली. केवळ जमीदाराची आवडती बायको म्हणून नव्हे तर एव्हढ्या मोठ्या घरसंसाराची ती गृहिणी होती. गांवच्या बायका तिला गटागटानं भेटायला येत होत्या. वयानं वडील होत्या त्या पायावर डोयी ठेवून जात होत्या. आली नाहीं काय ती बिपिनची बायको. ती येणार नाहीं अशी हरिलक्ष्मीची खात्री होती.

या एका वर्षाच्या मुदतींत त्यांचं कसं चाललं होतं, जे फौजदारी आणि दिवाणी दावे त्यांच्याविरुद्ध चालले होते त्यांचा निकाल काय

लागला होता या बाबतींत कुणाकडूनही माहिती घेण्याचा तिनं मुळींच प्रयत्न केला नाहीं. शिवचरण केव्हां घरीं असे तर केव्हां तिच्याकडे जाऊन रहात असे. त्यावेळीं सर्वांआधीं हेच प्रश्न तिच्या-समोर उभे रहात. तरीही एक दिवसही नवऱ्याला तो प्रश्न तिने विचारला नव्हता—प्रश्न करायलाच तिला भीति वाटे; इतक्या दिवसांत दोघांमध्यें काहीतरी समेट झाला असावा, रागाची चढती कमान आतां उतरली असावी.–आपण प्रश्न केला तर कदाचित् पुन्हां पूर्वीचा राग वाढून उठेल असे वाटून ती अशा प्रकारचा आव आणी कीं त्या साऱ्या क्षुल्लक गोष्टी जणूं तिच्या ध्यानींमनींही नाहीत.

इकडे शिवचरणसुद्धां स्वतः बिपिनची कोणतीच गोष्ट काढीत नसे. आपल्या बायकोचा झालेला अपमान तो विसरला नव्हता, इतकंच नव्हे तर तिच्या गैरहजेरींत जे काहीं करायचं ते त्यान केलं होतं. त्या साऱ्या गोष्टी तो हरिलक्ष्मीपासून चोरून ठेवीत होता. लक्ष्मीनं घरीं यावं, स्वतःच्या डोळ्यानं सारं कांहीं पहावं आणि आनंदानं बेभान होऊन जावं असं त्याला वाटत होतं.

दिवस वर आला होता. आत्याबाई पुन्हा पुन्हा मोठ्या प्रेमानं घाई करीत होती. तिच्या जिकिरीला मान देऊन लक्ष्मी स्नान करून आली तेव्हां ती म्हणाली, "तुझी प्रकृति तितकीशी बरी नाहीं सूनबाई, आतां खालीं जाऊं नकोस. इथंच ताट वाढायला सांगतें तुझं."

लक्ष्मी हंसून म्हणाली, "आता माझी प्रकृति पूर्वींच्यासारखी झाली आहे आत्याबाई, मी आपली सैपाकघरातच जाऊन बसेन

जेवायला. उगाच वर जेवण आणण्याची उठाठेव कशाला ? चला मी खालींच येतें. ”

आत्याबाईनीं तें ऐकून घेतलं नाहीं. तिच्या नवऱ्याचा तसा हुकूम आहे असं सांगून तिचं पाटपान तिनं तिथंच मांडायला सांगितलं. तितक्यांत वाढायचे जिन्नस आणून जेवण वाढून सैपाकीण निघून गेली. ती निघून गेल्यावर जेवायला बसतांना लक्ष्मीनं विचारलं, “ ही कोण सैंपाकीण आत्याबाई ? पूर्वी पाहिली नव्हती. ”

आत्याबाई हंसून म्हणाली, “ ओळखली नाहींस तिला ? ती आपल्या बिपिनची बायको. ”

लक्ष्मी बसल्याजागीं सुन्न होऊन राहिली. तिला चकित करून टाकण्यासाठीं हा सारा कट गुप्त राखण्यांत आला होता. थोड्या वेळानं स्वतःचं मन सांवरून घेऊन चौकस मुद्रेनं ती आत्याबाईच्या तोंडाकडे पहात राहिली.

आत्याबाई म्हणाल्या, “ बिपिन वारला तें माहीत आहे ना ? ”

लक्ष्मीला माहीत नव्हतं कांहींच पण आता जी बाई जेवण वाढून निघून गेली ती विधवा होती हे पहातांक्षणींच तिला कळून आलं होतं. मान हालवून ती म्हणाली, “ हो. ”

बाकीची सारी हकीगत आत्याबाईनं सांगितली—‘ जें कांही होतं नव्हतं तें सारं कोर्टाखटल्यापायीं हरपून गेल्यानंतर बिपिनही मयत झाला. बाकीच्या देण्यापायीं घरसुद्धां गेलं असतं, पण आम्हीं तिला सांगितलं, सूनबाई, वर्ष दोन वर्षं इथं नोकरी करून देणं फेडून टाक. तुझ्या अजाण मुलाला डोकं टेकायला तरी घर राहूं दे. ’

लक्ष्मीचा चेहेरा गोरामोरा झाला होता. डोळे ताठरून ती मुकाट्यानं पहात राहिली होती. आवाज खाली आणून आत्याबाई हळूंच म्हणाली, " तेव्हां मी एक दिवशीं तिला बाजूला बोलावून घेतलं आणि म्हटलं, सूनबाई, जे व्हायचं ते होऊन गेलं. आतां उधार उसनवार कांहींतरी करून एक वेळ काशीला जा, जाऊन धाकट्या सूनबाईचे पाय धर, मुलाला नेऊन तिच्या पायावर घाल आणि सांग, आक्का, या पोराचा कांहीं अपराध नाहीं, याला तेवढा वांचव. "

हे सांगत असतांना आत्याबाईचे डोळे भरून आले होते. पदराने ओले डोळे पुसून घेऊन ती म्हणाली,—" पण ती जी मान खालीं घालून बसली तें तिनं हूं कीं चूं सुद्धां केलं नाहीं. "

हरिलक्ष्मीला कळून चुकलं, या साऱ्या अपराधाचं खापर आपल्याच माथ्यावर फुटलं आहे. तिच्या तोंडचा घांस तोंडांतच राहिला. तो विषासारखा झाला. कांही केल्या एक शीतसुद्धां तिच्या घशाखालीं उतरेना. तितक्यांत आत्याबाई बाहेर गेली होती ती आंत आली. जेवण तसंच राहिलं आहे असं पाहून घाबरीघुबरी होऊन ती ओरडली, " अग ए निखिलची आई, इकडे ये. "

जाऊबाई येऊन दाराशीं उभी राहिल्याबरोबर आत्याबाईच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. थोड्या वेळापूर्वी करुणेनें ओलावलेले तिचे डोळे पहातां पहातां कोरडे झाले. उसळून उठून ती म्हणाली, " ही असली हातचलाखी करून चालायचं नाहीं बरं ! सूनबाईच्या तोंडांत एक शीतसुद्धां गेलं नाहीं असा स्वैंपाक तरी काय केला होतास ? "

दाराबाहेर उभ्या राहिलेल्या व्यक्तीच्या तोंडून कांहींच उत्तर आलं नाहीं. त्या बाहेरच्या व्यक्तीचा झालेला हा अपमान पाहून आंत बसलेल्या हरिलक्ष्मीची मान शरमेनें आपोआप खालीं झाली. आत्याबाई तशीच बोलत होती, " नौकरी करायची म्हणजे अशा चांगल्या वस्तूंचा असा नाश करून चालायचं नाही बाई ! घरचे चार नोकर जसं काम करतात तसंच तुला केलं पाहिजे इथ. सांगून ठेवते. "

बिपिनची बायको यावेळी हलकेच म्हणाली. " जे काम करायच ते जीव टाकून करते आहे मी आत्याबाई. आज असं काय झालं कोण जाणे——" असं म्हणून ती खालीं निघून गेली.

लक्ष्मी पाटावरून उठून उभी राहिली त्यावेळी आत्याबाई चुकचुकूं लागली. लक्ष्मी शांतपणें म्हणाली, " उगीच वाईट वाटून कशाला घेतां आत्याबाई ? माझी प्रकृति बरी नाही म्हणून अन्न जात नाहीं मला. जाऊबाईच्या स्वैपाकांत कसलीच खोड नव्हती. "

आंचवून जेव्हां हरिलक्ष्मी आपल्या एकांत खोलीत आली, त्यावेळीं तिचा श्वास अटकूं लागला होता. सर्व प्रकारचा अपमान सहन करूनही बिपिनच्या बायकोला यापुढे या घरीं नोकरी करीत रहाणं परवडलं असतं—पण आजचा प्रकार झाल्यानतर निष्कारण गृहिणीपणा गाजवून आपलं कसं चालेल हेंच तिला कळेना. तरीही समाधानाला तिला एकच जागा होती——निर्दोष असूनसुद्धां मुकाट्यानं दु:ख सहन करणं—तेव्हढंच एक समाधान !—पण आपलं म्हणून म्हणायला तिच्या लेखीं आतां कुठं काय राहिलं होतं ?

रात्रीं नवऱ्याची भेट झाली तेव्हां हरिलक्ष्मीला वर नजर करून त्याच्या तोंडाकडे पहाणं देखील कठिण गेलं. तिच्या तोंडच्या एका

शब्दासरशीं आज बिपिनच्या बायकोचं सारं दुःख दूर झालं असतं—पण निराधार स्त्रीवर जो माणूस एव्हढा मोठा सूड घ्यायला समर्थ होतो, तसं करणं ज्याच्या पौरुषाआड येत नाहीं, अशा माणसासमोर भिक्षेसाठी कमीपणा पत्करायला लक्ष्मीचं मन काहीं केल्या तयार होईना.

शिवचरणनं थोडंसं हंसून विचारलं, " काय ? आतां भेटली तुझी जाऊबाई ? कशी काय सैंपाक करते ? "

हरिलक्ष्मीला उत्तर देतां आलं नाहीं. तिला वाटलं हाच मनुष्य का आपला नवरा ? याच माणसाबरोबर का संसार करायचा आहे आपल्याला ? हा विचार मनांत येऊन तिला पुन्हां वाटलं—धरणी-माते, दुभंग हो !

दुसरे दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर लक्ष्मीने मोलकरणीकरवी आत्त्याबाईला निरोप पाठविला, ' मला ताप आला आहे, मला जेवायच नाहीं. ' आत्त्याबाई धांवत आली आणि लक्ष्मीला आग्रह करूं लागली तिची मुद्रा पहातांच आत्याबाईला संशय आला. तिला वाटलं, लक्ष्मी आपल्यापासून कांहींतरी लपवायचा प्रयत्न करते आहे. ती म्हणाली, " तूं खरोखरीच आजारी नाहींस सूनबाई. "

लक्ष्मी जोराजोरानं म्हणाली, " मला ताप आलाय्. मी कांहीं खायची नाहीं. "

डॉक्टर आले तेव्हां तिनं त्यांना बाहेरच्या बाहेर वाटेला लावीत म्हटलं, " आपल्या औषधानं मला गुण आला नव्हता, तें माहीत आहे ना आपल्याला ? आपण जा आतां. "

शिवचरण आला अन् त्यानं कितीतरी प्रश्न केले पण तिनं एकाचंही उत्तर दिलं नाहीं. आणखीं असेच दोनतीन दिवस गेले. तिच्यांत कांहींच बदल होत नाहीं असं पाहून घरच्या साऱ्या माणसांच्या तोंडचं पाणी पळालं.

त्या दिवशीं दुपार उलटून गेली होती. लक्ष्मी न्हाणीघरातून बाहेर येऊन मुकाट्यानं पाऊल देखील न वाजवितां अंगणाच्या एका बाजूनं वर जायला निघाली होती. तिला पाहातांच सैपाकघराच्या दारांतूनच आत्याबाई ओरडत उठून म्हणाली, " हें पहा सूनबाई, बिपिनच्या बायकोचं हें कर्म पहा ! काय ग तरी बाई. शेवटीं चोरी करायला लागलीस होय ? "

हरिलक्ष्मी जवळ जाऊन उभी राहिली. बिपिनची बायको मान खालीं घालून जमिनीवर बसली होती. तिच्यासमोर टुवालानं झांकलेलं वाढलेलं ताट होतं. तें दाखवून आत्याबाई म्हणाली, " आता तूंच सांग सूनबाई, एव्हढी भातभाजी आमटी एकट्या माणसाला खातां येईल का ? घरीं घेऊन जात असते आपल्या पोरासाठीं. पुन्हा पुन्हां असं करूं नको म्हणून सांगावं लागतं. शिवचरणाच्या कानीं गेलं तर मात्र मग घडगत नाहीं—बखोटीला धरून घराबाहेर घालवून देईल. सूनबाई, तूं इथली मालकीण, तूंच काय तो न्याय कर. " असें म्हणून आत्याबाईनं एका महत्त्वाच्या कर्तव्यातून पार पडल्याचा उसासा टाकला.

तिची आरडाओरड ऐकून घरातले सारे नोकरचाकर, दासदासी तो तमाशा पहाण्यासाठीं धांवतच येऊन गोळा झाले होते, आणि त्या

साऱ्या माणसांनीं केलेल्या घेऱ्यांत मुकाट्यानं बसली होती त्या घरची जाऊबाई--आणि उभी होती त्या घरची मालकीण आणि गृहिणी.

इतक्या क्षुल्लक गोष्टीच्यापायीं इतके अवचट आणि ओंगळ प्रकार घडतील असं लक्ष्मीच्या स्वप्नांतसुद्धां आलं नव्हतं. आत्याबाईच्या प्रश्नाला ती उत्तर तरी काय देणार होती ? शरमेनं खालीं घातलेली मान वर करून पाहाणंसुद्धा तिला अशक्य झालं होत. शरम दुसऱ्यासाठीं नव्हे तर शरम वाटत होती ती स्वतःचीच. तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या. तिला वाटलं, एव्हढ्या लोकां-समक्ष आपण नाटीवर पकडले गेलो आणि बिपिनची बायकोच आपल्याला न्याय द्यायला उभी राहिली आहे !

दोनतीन मिनिटं ती तशीच उभी राहिली होती. एकदम ती भानावर आली. मोठ्या कष्टानं तिनं आपलं मन आवरून घेतलं आणि म्हटलं, " आत्याबाई, तुम्ही सारीं माणसं एकदम इथून निघून जा पाहूं. "

त्या करड्या हुकुमासरशीं सारीं माणस एकदम निघून गेलीं. लक्ष्मी हळूहळू जाऊबाईजवळ जाऊन बसली. तिच्या हनुवटीखालीं हात घालून तिनं तिचं तोंड वर उचलून पाहिलें त्यावेळीं तिच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा सारख्या वहात होत्या.

लक्ष्मी म्हणाली, " जाऊबाई, मी तुझी आक्का. " असें म्हणून तिनें आपल्या पदरानें तिचे डोळे पुसले.

# टीपा आणि टांचणें

हरिलक्ष्मी ही कथा बंगालमधील कुटुंब पद्धतींतील व्यंगें समोर मांडणाऱ्या शरद् बाबूंच्या इतर चांगल्या कथांपैकी एक आहे. बंगालच्या कुटुंब-पद्धतीत श्रीमंत आणि गरीब या भेदामुळे जे विशिष्ट प्रकारचे भेद निर्माण झालेले आहेत; त्याचें हरिलक्ष्मी हे एक चित्र आहे. मानवी स्वभावातील सूक्ष्म संवेदना प्रदर्शित करण्यासाठीं लिहिलेली ही कथा बंगालच्या वातावरणात निर्माण झालेली असली तरी भारताच्या कोणत्याही प्रांतात त्यातील परिस्थिति समजून घ्यायला कठीण जाणार नाही.

**प्रश्नमाला** :—

१ : शिवचरण आणि विपिन यांची आर्थिक परिस्थिति कशी होती ?

२ : शिवचरणचे शब्द-चित्र तुम्हीं आपल्या भाषेंत रेखाटा.

३ : विपिनच्या पत्नीचें-कमलेचें-दारिद्र्य वर्णन करणारीं कांहीं वाक्ये द्या.

४ : शिवचरणच्या अडमुठेपणामुळे विपिनचें घराणें धुळीला मिळालें; कसे तें सांगा ?

५ : शिवचरण आणि हरिलक्ष्मी या दाम्पत्याचे गुण-दोष वर्णन करा.

६ : हरिलक्ष्मी आणि कमला यांच्यात तुमच्या दृष्टीने अधिक सुसंस्कृत कोण ? का ?

७ : विपिनचा नाश करण्याची प्रतिज्ञा हरिचरणने कशी पुरी केली ?

८ : शिवचरणच्या अंगीं जंगलीपणाचे अनेक नमुने दिसून येतात, ते कोणते ?

९ : निखिलला हरिलक्ष्मीनें दिलेली माळ कमलेनें घेतली नाहीं; त्यामुळे हरिलक्ष्मीचा अपमान झाला. त्याचा सूड तिनें कसा घेतला ?

१० : " दोन भावाच्या स्वभाव–वैचित्र्यामुळें दोन भावांमधील तेढ वाढत गेली आणि तिचा शेवट नाशात झाला; " हें ह्या कथे-वरून सिद्ध करा.

११ : या कथेंत आत्याबाईंनीं कोणती कामगिरी बजावली आहे ?

१२ : कथेचा शेवट अत्यंत हृदयस्पर्शी वाटतो. त्याचे कारण काय ?

**भाषासौंदर्यः**

–शांत अशा नदीकिनारी शांत अशा जहाजाच्याजवळ एक लहानशी होडी अगदीं निरुपद्रवी प्राण्यासारखी बांधून ठेविली होती. (पृ.२८)

–रिकामं घर एक दिवशी सोळा कलांनीं उजळून उठलं. (पृ २९)

–या साऱ्या बोजाखालीं चेंगरून केव्हा केव्हा तिचं मन बंड करायला सरसावे. (पृ.३४)

–श्रोता या नात्यानं जाऊबाई कितीही उदार असली तरी वक्ता या नात्यानं ती चांगलीच कंजुष होती. (पृ.३८)

–अगदीं काट्याला काटा जुळवून घड्याळ पाहून घरीं येतात का भाऊजी ? (पृ.३९)

–साडेपंधरा आणे उठाठेव करून शिवचरणने मोठ्या थाटात हवा बदलायचा समारंभ करण्याचा बेत केला. (पृ.४१)

–शंभर वर्षं उमरीचं ते थकलं भागलेलं घर— (पृ.४३)

# महेश

## १

गांवाचें नांव काशीपूर. गांव लहान तसाच त्याचा जमीदारही लहान. पण त्याचा दरारा होता मोठा. प्रजेला हूं करायची देखील ताकद नव्हती.

धाकट्या मुलाच्या वाढदिवसाची पूजा होती. पूजा आटोपून तर्करत्न दोन प्रहरीं घरीं परत येत होते. वैशाख सपला होता, पण ढगाचा कुठें मागमूसही नव्हता. कोरड्या आकाशातून नुसती आग खालीं कोसळत होती.

समोरचा भला मोठा सडा जाळून पोळून शुष्क होऊन गेला होता. कडकडणाऱ्या रोजच्या तापाने धरित्रीमातेच्या काळजांतले रक्त वाफ होऊन उडून जात होतें. आगीच्या लोळामारखी त्या वाफेची सर्पाकार गति पहात राहिले तर मस्तकांत झिणझिण्या उठत—जणुं कैफ चढे. याच्याच सीमेवर रस्त्याच्या बाजूला गफूरचें घर होते. त्याच्या घराची मातीची भिंत कोसळून अगणांत मिसळली होती नी त्यामुळें बायकामाणसांना तोंड आड करण्याजोगा घराच्या आंतला आडोसा उघडा पडून, वाटेच्या वाटसराकडे काकुळतवाण्या दृष्टीने पाहात होता.

रस्त्याच्या बाजूला असलेल्या एका झाडाच्या सावलीला उभे राहून तर्करत्नांनीं मोठ्यानें हांक घातली, " अरे ए गफऱ्या, घरीं आहेस का रे ? "

त्याची नऊ दहा वर्षांची मुलगी दारांत उभी राहून म्हणाली, " बाबा कशाला हवेत ! बाबाला ताप आला आहे. "

" ताप ! बाहेर बोलाव हरामखोराला. पाजी ! म्लेच्छ ! "

त्याची आरडाओरड ऐकून गफूरमिया बाहेर आला. ताप भरल्यामुळें तो थरथर कांपत होता तरीही तसाच येऊन जवळ उभा राहिला. कांसळलेल्या भिंतीला चाटून एक जुनेपुराणें बाभळीचे झाड होतें. त्याच्या बुध्याला बांधलेला एक बैल होता. त्याच्याकडे बोट करून तर्करत्न म्हणाले, " हे काय चाललं आहे सांग पाहूं. हे हिंदूचं गांव, जमीदार ब्राह्मण, माहीत आहे का तुला ? "

बोलताना त्यांचा चेहरा तांबडालाल झाला होता. असल्या तापलेल्या तोंडातून जळजळीतच भाषा निघायची. —पण या उद्गारांचा अर्थ काय याची कल्पना न आल्यामुळें गफूर नुसता पाहात राहिला.

तर्करत्न म्हणाले, " सकाळीं जातांना पाहिलं तो बाधलेला. दुपारीं येतांना पाहिलं तों तसाच बांधलेला. गोहत्त्या झाली तर धनी तुला कबरेत जिवंत गाडतील. असला तसला ब्राह्मण नव्हे तो ! "

" काय करूं बाबाठाकूर ? मोठा लाचार होऊन पडलों आहें. बरेच दिवस तापानं पडलोय बिछान्यावर. दोरी धरून बाहेर कुठं चरवून आणीन म्हटलं तर वाटेंतच चक्कर येऊन पडेनसं वाटतं. "

" तर मग सोडून दे. तोच चरेल नी येईल परत. "

" कुठं सोडूं बाबाठाकूर ? नुकतीच लोकांची कापणी झाली आहे. अजून मळणी झाली नाहीं. धान्य पडून राहिलं आहे अंगणांत. तें गवत कांहीं अजून हातीं आलं नाही. सड्यावरचं गवत करपून नाहींसं झाल. एक मूठभरसुद्धां नाहीं कुठं कांहीं. कुणाच्या अंगणांतल्या कापणीत तोंड घातलं आणि कुणी तरी त्याला बांधून ठेवलं तर सोडवून आणू कसा बाबाठाकूर ? "

तर्करत्न नरम आले आणि म्हणाले, " नाहीं तसं सोडायचं तर कुठं तरी सावलींत बांध त्याला आणि एक दोन पेंढ्या कसला तरी

ओला पाचोळा आणून टाक त्याच्यापुढं. राहील रवंथ करीत. तुझ्या पोरीनं भात नाहीं का राधला घरांत ? पेज असली तर ती दाखव ना त्याला घमेल्यातून. ”

गफूरनें उत्तर दिले नाहीं. हताश होऊन तो तर्करत्नांच्या तोंडाकडे पहात राहिला. एक मोठा उसासा त्याच्या तोंडून सहज निघून गेला.

तर्करत्न म्हणाले, “ तीही नाहीं वाटत ? गवत काय केलंस ? भागाला आलेलं सारं विकून टाकून पोटायनमः केलंस होय ? बिचाऱ्या मुक्या जनावरासाठी थोडंस ठेवलंस सुद्धा नाहीं ? कसाई बेटा ! ”

निर्दयपणाने केलेल्या या आरोपामुळे गफूरच्या तोंडून एक शब्दही बाहेर निघेना. थोड्या वेळाने तो आस्ते आस्ते म्हणाला, “ गेल्याच्या मागल्या वर्षी थोडंस गवत आलं होतं माझ्या वांट्याला. पण गतसाली धन्यांनी सारं गवत घेतलं आपल्या ताब्यांत. रडलो कढलों, हातीपायीं पडलो आणि म्हटलं, बाबू महाशय, तुम्ही आमचे मायबाप. तुमची राजवट सोडून जायचं कुठं ? मला दहापाच भारे गवत सोडून द्या ना. घरावरच्या केंबळ्याला सुद्धा गवत नाही. घरातली एकच खोली आतां राहिली आहे शिल्लक, त्यांत बापबेटी राहतो. ताडाच्या झावळ्या घालून या वर्षी कसंबसं भागवून घेईन. पण खायला गवत मिळालं नाही तर माझा महेश मरेल मात्र. ”

तर्करत्न हंसत सुटले आणि म्हणाले, “ अन् नांव सुद्धां महेश ठेवलं आहेस नाहीं का ? वा ! वा ! हंसतांना बेजार झालों अगदीं ! ”

त्यांची ही खोंच गफूरच्या ध्यानीं आली नाहीं. तो तसाच बोलत होता, “ —पण धन्याना कांहीं दया आली नाही. दोन महिन्यांच्या खुराकाला पुरेल एव्हढं धान्य दिलं मला, पण सारं गवत सरकारांत

जमा केलं. माझा भाग सुद्धां मला दिला नाहीं—" बोलतां बोलतां त्याचा गळा दाटून आला, डोळ्यांतले आसवे पाझरूं लागलीं.

पण तर्करत्नाना कांहीं त्याची दया आली नाही. ते म्हणाले, " बराच दिसतोस तू ! तुला तेव्हढ खायला हवं द्यायला नको का कुणाला ? जमीदारान काय आपल्या घरचं अन्न आणून खायला घालावं तुम्हांला होय ? अरे, रामराज्यांत राह्यला मिळालंय तुम्हाला. हलकटच की नाहीं, म्हणून अशी निंदा करतोयस त्यांची. "

गफूर शरमिंदा होऊन म्हणाला, " मी कशाला निंदा करीन बाबाठाकूर ? निंदा कधींही करायचा नाहीं बर मी. पण कुठून देऊ तें सांगा ना ! भागेली म्हणून चार वर्षं जमीन करतो, पण गेलीं दोन सालं कोरडीं गेलीं. शेतांतलं धान्य शेतात वाळून गेलं. बाप-बेटीला दोन वेळच अन्न सुद्धां पोटभर मिळालं नाहीं. जरा घराकडे बघा ना नजर टाकून. वादळ पाऊस आला तर पोराला अंगाखालीं झांकून धरून कोपऱ्याखालीं रात्र काढतों. पाय सोडून झोपायला सुद्धा जागा नाहीं. महेशाकडे बघा ना एकदां. सापळा झालाय नुसता. उसनं म्हणून द्या ना एक दोन भारे गवत बाबाठाकूर. बिचाऱ्या मुक्या जनावराला दोन दिवस तरी पोटभर मिळूं दे "

बोलतां बोलतां तो त्या ब्राह्मणाच्या पायाजवळ मट्कन खालीं बसला. तर्करत्न ताड्कन उडी मारून दोन पावले मागें हटले आणि म्हणाले, " अरे मेल्या, शिवणार आहेस कीं काय मला ? "

" नाहीं बाबाठाकूर. मी कशाला शिवेन ? कसंही करा पण मला दोन भारे गवत द्या. एव्हढीं उडवीं रचली आहेत तुमचीं गवताचीं, त्यांतलं एव्हढंसं गवत दिलं तर कळायच सुद्धां नाहीं कुणाला. आम्हीं उपासपोटीं मेलों तरी चालेल. पण ही मोनजात-

स्वतः बोलतां येत नाहीं. नुसता टकमक पाहातो तोंडाकडे नी आंसवं गाळतो डोळ्यांतून. ”

तर्करत्न म्हणाले, “ उसने म्हणून मागतोस, पण फेडणार आहेस कसा ते सांग ना. ”

आशाळभूतपणाने गफूर घायकुतीला येऊन म्हणाला, “ काय वाटेल ते करून फेड करीन बाबाठाकूर. कधीं बुडवणार नाहीं तुमचं देणं. ”

तर्करत्नांनी तोंड वांकडं करून गफूरच्या केविलवाण्या बोलांची नक्कल करीत म्हटले, “ बुडवणार नाही ! वाटेल ते करून फेडीन ! रसिक नागरच का नाहीं ! जा जा, हो बाजूला. सोड माझा रस्ता. घरी जायला उशीर झाला. ” असे म्हणून गालांतल्या गालात हंसून ते मागें हटत होते, पण बाजूला सरून रागारागाने म्हणाले, “ मर लेकाच्या. शिगं रोखून येतो आहे. मारणार आहे की काय मला ? ”

गफूर उठून उभा राहिला, तर्करत्नांच्या हातांत फळेमुळे, भाजी आणि ओल्या तांदळाची मोटली होती, ती दाखवून देऊन तो म्हणाला, “ वास आला आहे त्याला. एक मूठ खायला मागतो आहे– ”

“ खायला मागतो आहे म्हणे ! छान ! छान ! जसा शेतकरी तसाच त्याचा बैल ! गवत मिळत नाहीं, तेव्हां केळी, तांदूळ खायला हवेत बेट्याला. ने, ने त्याला, बांध पलीकडे. याचं हे शिग एक दिवशी कुणाचा तरी खून करणार ! ” असे म्हणून बाजूला सटकून टणटण उड्या मारीत तर्करत्न वर निघून गेले.

भटजी महाराजांकडची दृष्टी वळवून गफूर कांहीं वेळ महेशाच्या तोंडाकडे पहात राहिला होता. महेशाचे काळेभोर डोळे भुकेने पागुळले होते, काकुळतवाणे झाले होते.

गफूर म्हणाला, " तुला एक मूठ दाणे दिले नाहींत त्यानं, खूप आहे त्याच्या सांठ्याला. पण देत नाहीं. नको देऊ म्हणावं— "

त्याचा गळा भरून आला. त्याच्या डोळ्यांतून टपटप आंसवें गळूं लागलीं. तो महेशजवळ गेला आणि हळूहळू त्याचा गळा, माथें आणि पाठीवर हात फिरवीत फिरवीत पुटपुटत त्याच्याशी बोलूं लागला, " तूं माझा मुलगा आहेस महेश. आठ साल आमचा प्रतिपाळ करून म्हातारा झाला आहेस—आणि तुला कांहीं पोटभर खायला घालतां येत नाहीं. पण तू केव्हढा लाडका आहेस माझा, ते तूंच जाणतोस बाबा. "

उत्तरादाखल त्यानें मान लांब करून घांसली आणि डोळे झाकून घेतले. डोळ्यांतलें पाणी बैलाच्या पाठीवर पुसून गफूर तसाच पुटपुटत होता—" जमीदारानं तुझ्या तोंडचा घांस काढून घेतला. मसणाच्या बाजूला गांवचा गुरचराव होता. तो पैशाच्या लोभानं दुसऱ्याला खंडानं देऊन टाकला. हीं दोन वर्षं कसा तुला जगवून ठेवूं, सांग ना ? सोडून दिला तुला, तर परक्याच्या गंजींत जाऊन घुसशील. कुणाच्या तरी केळींना तोंड लावशील—आतां कसा सांभाळूं तुला ? तुझ्या अंगांत ताकद नाहीं, गांवच्या लोकांना तूं नकोसा झालेला—पांजरपोळांत नेऊन टाका म्हणतात— " मनांतल्या मनांत हें एव्हढें बोलत असतांना सुद्धां त्याच्या अंगावर शहारे आले आणि याच्या दोन्ही डोळ्यांतून टपटप आंसवें पडूं लागलीं.

डोळयांतील आंसवे हातांनी पुसून गफूरने एकदां इकडे तिकडे पाहिले. मोडक्या घराच्या छपरावरून मळकटलेल्या केंबळयाचें गवत काढून आणून तें महेशाच्या तोंडाजवळ धरून तो म्हणाला, “ घे. लवकर लवकर खाऊन टाक बाबा. उशीर केलास तर—”

“ बाबा ! ”

“ काय पोरी ? ”

“ जेवायला या ना. ” असे म्हणून अमीना आंतून बाहेर दारावर येऊन उभी राहिली. एक क्षणभर त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, “ महेशला केंबळयाच गवत काढून दिलंत, होय बाबा ? ”

याच कर्माला तो भीत होता. तो शरमून म्हणाला, “ जुनंपुराणं सडलेलं गवत - सरकून पडलं होतं खालीं—”

“ मी आंतून ऐकलं बरं बाबा. तुम्ही स्वतः ओढून काढलं गवत. ”

“ नाहीं ग पोरी. तस अगदींच काहीं ओढून काढल नाही - ”

“ पण उघडी पडलेली भिंत कोसळेल ना आता ? ”

गफूर उगीच राहिला. एक खोली सोडून सारे घर कोसळलें होते. असेंच चालत राहिले तर या वर्षाच्या पावसाळयांत ती खोलीही उभी राहणार नाहीं हें त्याच्याखेरीज दुसऱ्या कुणाला जास्त कळत होतें ? बरे, असें केंबळयाचें गवत काढून तरी किती दिवस चालणार होतें ?

मुलगी म्हणाली, “ हात धुवून भात खायला बसा. या मी वाढून ठेवलंय. ”

गफूर म्हणाला, “ वाढून घेतलेली पेज दे ना पोरी. तेव्हढी याला देऊन येतों. ”

“ आज पेज नाहीं बाबा. हंडींतच जिरून गेली. ”

" नाहीं ? "

गफूर स्तब्ध होऊन राहिला.

संकटाच्या काळांत पेज टाकून देणे सुद्धां योग्य नव्हतें हें त्या दहा वर्षांच्या पोरीला कळत होते. हात धुऊन तो आंत जाऊन उभा राहिला. एका पितळेच्या थाळींत बापासाठीं भातभाजी आणि स्वतःसाठीं एका मातीच्या टोकरींत तिने नुसताच भात वाढून घेतला होता. कितीतरी वेळ तिकडे पहात राहिलेला गफूर म्हणाला, " अमीना, मला पुन्हा थंडी भरून येतेय पोरी. अगात ताप असतांना जेवणं धरं का ? "

अमीना उद्विग्न होऊन म्हणाली, " पण आत्ताच म्हणत होता कीं भूक फार लागलीय म्हणून. "

" तें तेव्हां ! तेव्हा अंगांत ताप नव्हता ग पोरी. "

" तर मग उचलून झांकून ठेवतें. सध्याकाळीं खा. "

गफूर मान हालवीत म्हणाला, " नाहीं ग शिळा भात खाल्ला तर आजार वाढेल ना अमीना ! "

अमीना म्हणाली, " मग काय करूं तर ? "

गफूरने बराच वेळ विचार केला आणि एकदम या अडचणींतून मार्ग काढला. तो म्हणाला, " एक काम कर पोरी. हे एव्हढं ताट महेशच्या पुढं ठेवून ये. रात्रीं मला मूठभर तांदळांची पेज दे म्हणजे झालं. देशील ना ? "

तिच्या तोंडून उत्तर येईना. क्षणभर ती बापाच्या तोंडाकडे पाहात राहिली होती त्यानंतर मान खाली घालून ती हळूच म्हणाली, " हो, देईन. "

गफूरचा चेहरा उजळून उठला. बापलेकीच्या मध्यें हें जे छोटेसे नाटक झाले ते त्या दोघांखेरीज आणखी अंतरिक्षांत कुणी तरी एक-जण पहात होता वाटत !

पाचसात दिवस निघून गेले. एके दिवशीं आजारी असलेला गफूर एव्हढेसे तोंड करून बसला होता. कालपासून त्याच्या महेशचा कुठें पत्ता नव्हता. तो स्वतः दुबळा होऊन पडला होता म्हणून अमीना सकाळपासून सर्वत्र फिरून त्याचा शोध काढीत होती. संध्याकाळच्या सुमाराला ती परत आली आणि म्हणाली, " ऐकलत बाबा, माणिक घोषच्या माणसानी महेशला नेऊन कोंडवाड्यात टाकल आहे म्हणे ! "

गफूर म्हणाला, " चल, वेडी कुठली. "

" खरोखरच बाबा, खरोखर. त्याचा नोकर म्हणाला, की तुझ्या बापाला दर्यापूरच्या कोंडवाड्यात जाऊन तपास करायला सांग. "

" काय केलं त्यानं ? "

" त्यांच्या बागेंत शिरून नासधूस केली. "

गफूर स्तब्ध झाला. महेशचे काय झाले असेल याची वेगवेगळ्या प्रकारें कल्पना करून तो अदाज बांधीत होता. पण ही कल्पना मात्र त्याला सुचली नव्हती. तो जितका भोळा तितकाच साधा होता. आपला शेजारी आपल्याला एव्हढी मोठी अद्दल घडवील अशी त्याला शंका सुद्धां आली नव्हती. विशेषतः माणिक घोष. गोब्राह्मणां-वर केव्हढी त्याची भक्ति !—केव्हढी प्रख्याति होती त्या पंचक्रोशीत ! मुलगी म्हणाली, " दिवस मावळूं लागला आहे. महेशला आणायला जाणार ना ? "

गफूर म्हणाला, " नाही. "

" पण ते म्हणाले, कीं तीन दिवस होऊन गेले तर पोलिसचे लोक त्याचं लिलांव करतील म्हणून. "

गफूर म्हणाला, " करूं देत. "

लिलांव करून विकायचें म्हणजे काय हे अमीनेला नीटसे माहीत नव्हतें. पण महेशच्या बाबतींत असा कांहीं उल्लेख केला की बाप यापूर्वी कसा भडकून उठत असे हे तिनें पुष्कळ वेळ पाहिले होते. पण आज मात्र तो कांहींच न बोलतां तसाच निघून गेला.

रात्र झाली, काळोख पडला, तेव्हां गफूर बन्सीच्या दुकानीं आला आणि म्हणाला, " काका, एक रुपया हवा आहे. " असे म्हणून त्यानें एक पितळेची थाळी त्याच्या बसायच्या माचाखालीं ठेवून दिली. या वस्तूचें वजन वगैरे बन्सीच्या ओळखीचे होते. गेल्या वर्षांत निदान पांचसहा वेळ तरी ती थाळी गहाण ठेवून तो रुपया घेऊन गेला होता. अर्थात् आजही त्यानें कांहीं तक्रार केली नाही.

दुसऱ्या दिवशीं सकाळीच महेश जिथल्या तिथे असल्याचें दिसून आलें. तेंच बाभळीचें खोड, तीच दोरी, तीच खुंटी, आणि तीच गवत नसलेली गवाणी! काळ्याभोर डोळ्यांतील पाण्यानें डबरलेली तीच भुकाळु आणि उत्सुक दृष्टि! एकजण म्हातारा मुसलमान त्याला निरखून पारखून पाहात होता. जवळच एका बाजूला गफूर गुडघे पोटाशीं घेऊन मुकाट्यानें बसला होता. परीक्षा पुरी झाल्यावर त्या म्हाताऱ्यानें उपरण्याच्या गांठीचा एक दहा रुपयांची नोट बाहेर काढली आणि तिची पडलेली घडी मोडण्यासाठीं हातावर सरळ करीत तो त्याच्याजवळ गेला आणि म्हणाला, " यांत कमी करीत नाहीं. पुरेपूर देऊन टाकतो, घे. "

गफूरनें हात पुढें करून ती घेतली आणि तो तसाच मुकाट्याने बसून राहिला. त्या म्हाताऱ्याबरोबर जे दोघे आले होते त्यांनी दाव्याला हात घातल्याबरोबर तो एकदम ताडकन उठून उभा राहिला आणि ओरडून म्हणाला, " दाव्याला हात लावूं नको. सांगून ठेवतो ! खबरदार ! गोष्ट माझ्या कामीं यायची नाहीं. "

ते दोघे चमकले. म्हातारा चकित होऊन म्हणाला, " कां ? "

गफूर रागारागानें म्हणाला, " कां म्हणजे काय ? माझी वस्तु मी नाहीं विकणार—माझी खुषी. " असें म्हणून त्यानें नोट फेंकून दिली.

ते लोक म्हणाले, " काल वाटेनं येतांना बयाणा घेऊन आला होतास ना ? "

" हा तुझा बयाणाही घे ! " असें म्हणून त्यानें कनवटीचे दोन रुपये काढून झण् करून फेकून दिले.

तंटा माजायचा प्रसंग आहे असे पाहून तो म्हातारा पोक्तपणानें हंसून म्हणाला, " तंबी देऊन दोन रुपये जास्त घेणार आहेस—एव्हढंच ना ? दे रे, चहापाण्यासाठीं त्या पोरीच्या हातांत हे दोन रुपये दे. कसं ? असंच ना ? "

" नाहीं. "

" पण यापेक्षां एक अधेला सुद्धां जास्त मिळणार नाहीं. माहित आहे ? "

गफूर जोराजोरानें मान हलवून म्हणाला, " नाहीं नाही. "

म्हातारा चिरडीला आला. तो म्हणाला, " नाहीं म्हणजे काय ? चामड्याचे जे काय पैसे येतील तेव्हढेच. बाकी माल आहे कुठं इथं ? "

तोबा तोबा ! गफूरच्या तोंडून चट्कन् अशी कांहीं शिवी निघून गेली—

दुसऱ्या क्षणाला तो आपल्या घरांत घुसला आणि तिथूनच ओरडून तबी देऊं लागला, " आतांच्या आता गांव सोडून गेलां नाहींत तर जमीदाराचे लोक बोलावून जुतीं मारून घालवून देईन. "

तो त्याचा अवतार पाहून ते लोक निघून गेले. पण थोड्याच वेळानें जमीदाराच्या कचेरींतून त्याला बोलावणें आलें. गफूरला कळून चुकलें, कीं धन्याच्या कानीं ही गोष्ट गेली खास.

कचेरींत भलेबुर पुष्कळ लोक गोळा झाले होते. शिबूबाबू डोळे चढवून म्हणाले, " गफऱ्या, तुला काय शिक्षा द्यावी हेच कळत नाहीं मला. कुठं बसवाट करतो आहेस माहीत आहे ? "

गफूर हात जोडून म्हणाला, " माहीत आहे. खायलासुद्धां दमडी नाहीं, नाहींतर आपण जो दंड केला असता तो मुकाट्यानं भरला असता. "

सगळे आश्चर्यचकित झाले. हा माणूस मोठा जिद्दी आणि मिजासखोर आहे असा सर्वांचा समज होता.

तो रडकुंडीला येऊन म्हणाला, " असलं काम यापुढं कधींही करणार नाहीं धनीसाहेब. " असें म्हणून त्यानें आपल्याच हातानें आपले कान पिळले आणि अंगणाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत नाकघांसणी करीत शेवटीं तो उठून उभा राहिला.

शिबूबाबू दयाळू होऊन म्हणाले, " ठीक आहे. झालं गेलं होऊन गेलं. आतां यापुढं कधीं असली दुर्बुद्धि दाखवूं नकोस. "

एकंदर हकीगत ऐकल्यावर सर्वांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. गांवांत एवढे भयंकर पातक घडलेलें, पण केवळ मालकांच्या पुण्याईने आणि अक्कलहुषारीने त्याचें निराकरण झालें, अशी सर्वांची खात्री पटली.

तर्करत्न तिथे हजर होत. त्यांनीं ' गो ' शब्दाचें शास्त्रीय विवरण करायला सुरवात केली आणि सांगितलें, कीं एवढ्याचसाठीं धर्म-ज्ञानहीन म्लेंच्छ जातींना गांवाच्या तीन सीमेपलीकडे सुद्धां वस्ती करायला देणें निषिद्ध आहे. मोठमोठीं शास्त्रवचनें सांगून त्यांनीं सर्वांच्या डोळ्यांत अंजन घातलें.

गफूरने तोंडून एक शब्द सुद्धां काढला नाहीं. झाला तो अपमान योग्यच होता, म्हणून झाल्या शिक्षेपुढे मान वांकवून तो प्रसन्न चित्ताने घरीं आला. शेजारच्या घरांतून एक भांडें पेज आणून त्याने ती महेशला पाजली. आणि त्याच्या गळयावर, अंगावर, शिंगावर हात फिरवीत तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत तो महेशशी कानगोष्टी करूं लागला.

ज्येष्ठ महिना संपत आला होता. वैशाखात उन्हाळा केव्हढा डोंब उठला होता, ते आजच्या आकाशाकडे पाहिल्याशिवाय चांगलेसें कळले नसते. ओलाव्याचा कुठें मागमूस सुद्धां मिळत नव्हता. या हवेंत एक तसूभर तरी केव्हां बदल होईल, केव्हां आकाशात ढग येतील, केव्हां पावसाचे तुषार अंगावर पडतील, याची कल्पना करायला सुद्धां आज भीति वाटत होती असे वाटे, कीं साऱ्या आकाशांतून जळजळीत विस्तवाच्या ठिणग्या सारख्या पसरल्या जात

होत्या—त्यांना शेवट नव्हता. सारें कांही जाळून भस्मसात केल्या-शिवाय ही आग कांहीं थांबत नाहीं.

या असल्या दिवसांत दुपारच्या वेळीं गफूर घरीं परत आला. दुसऱ्याच्या दारीं जाऊन मोलमजुरी करायची त्याला संवय नव्हती. गेल्या चारपांच दिवसांतच त्याला ताप आला नव्हता. देह दुबळा झाला होता, मन थकलें होतें, तरीही आज सकाळींच तो काम पाहाण्यासाठीं बाहेर निघाला होता. सारा उन्हाळा माथ्यावरून गेला, पण हातीं कांहीं आलें नाहीं. भुकेतहानेनें व्याकुळ होऊन त्याच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली होती. अगणांतूनच हांक घालून त्यानें विचारलें, " अमीना, भात झालाय का ? "

मुलगी हळुहळू बाहेर आली आणि मुकाट्यानें भिंतीला टेकून उभी राहिली.

ती उत्तर देत नाहीं असें पाहून गफूर ओरडून म्हणाला, " झालाय भात ? काय म्हटलंस ? नाहीं ? कां नाहीं ? "

" तांदूळ नाहींत बाबा. "

" तांदुळ नाहींत ? सकाळीं कां मला सांगितलं नाहींस ? "

" काल रात्रीं मी बोललें होतें. "

गफूर तोंड वेंगाडून तिला वेडावून म्हणाला, " रात्रीं मी बोललें होतें म्हणे ! रात्रीं बोललं तर कसं कुणाच्या ध्यानांत रहाणार ?– " स्वतःचा कर्कश आवाज स्वतःच्याच कानीं गेल्यामुळें त्याचा राग दुप्पट वाढला. तो आणखीं तोंड वेडावून म्हणाला, " तांदुळ कसे असणार घरांत ? आजारी बाप घांसभर खावो कीं न खावो, या

बड्या पोरीला चारचार पांचपांच वेळ गिळायला हवा भात ! यापुढं तांदुळ पेटींत घालून कुलुप लावीन तेव्हां बाहेर जाईन. दे दे. एक पेलाभर पाणी दे. तहानेन व्याकुळ झालाय जीव. कीं तें सुद्धां नाहीं ? ”

अमीना तशीच मान खालीं घालून उभी राहिली होती. गफूरनें कांहीं वेळ वाट पाहिली. पण तहानेसाठीं घरांत घोटभर पाणीसुद्धां नाहीं हें जेव्हां त्याला दिसून आलें तेव्हां त्याला आपला राग आवरण अशक्य झालें. धांवतच जाऊन त्यानें काडूकन तिच्या थोबाडींत भडकावली आणि म्हटलें, “ काळतोंडी, हरामजादी पोर ! सारा दिवस करीत असतेस काय ? एव्हढीं माणसं मरताहेत—तूं कां मरत नाहींस ? ”

बिचारी पोर एक शब्दही बोलली नाहीं. मातीची रिकामी कळशी उचलून घेऊन तशा त्या कडक उन्हांत डोळे पुशीतपुशीत ती निघून गेली.

ती नजरेआड झाल्याबरोबर गफूरच्या हृदयाला बाण लागला. आईनसत्या या पोरीला त्यानें कशी लहानाची मोठी केली हें त्याचें त्यालाच माहित होतें. बिचारी मायाळू पोर, सारा दिवस खपत असे—तिचा कांहीं दोष नव्हता हे त्याच्या ध्यानीं आलें. शेतांतून आलेलें थोडेंबहुत धान्य संपल्यापासून दोन वेळ अन्न मिळणें सुद्धां यांना कठीण झालें होतें. केव्हां एक वेळ, तर केव्हां केव्हां मुळींच नाहीं. चारचार पांचपांच दिवस भाताचें शीत दिसणें देखील कठीण झालें होतें. तहानेसाठीं पाणीसुद्धां घरांत कां नव्हतें तेंही त्याला माहीत नव्हतें असें नाहीं. गांवांतल्या दोनतीन विहिरी होत्या त्या आटल्या होत्या. शिवचरणबाबूच्या तलावांत असलेलें पाणी सर्वांनाच मिळणें शक्य नव्हतें. बाकी तळयाविहिरींतून खड्डे खणून जें पाणी

मिळे त्याच्यावर सर्वांच्याच उड्या पडत. त्यांतून मुसलमानाची मुलगी म्हणून तिला सर्वांपासून दूर उभे राहून वाट पहात—करुणा भाकीत हातापायां पडत असतांना दयाळू होऊन कुणी एक तांब्या पाणी तिच्या घागरींत ओतले तर तें घरीं येई.

हें सारे कांहीं त्याला माहीत होतें. आज कदाचित् गांवांत पाणीच नसेल किंवा सर्वांच्या ओढाताणींत या पोरीवर दया दाखवायला कुणाला अवसरच मिळाला नसेल—असेच कांहींतरी झाले असावे हें मनात येऊन म्हाताऱ्याचे डोळे पांण्यानें भरून आले. इतक्यांत जमीदाराचा शिपाई अंगणांत यमदूतासारखा ओरडला, " गफूऱ्या, घरांत आहेस का ? "

कोरड्या गळ्यानें गफूर म्हणाला, " आहें. काय काम आहे ? "

" मालक बोलावताहेत, चल. "

गफूर म्हणाला, " माझं जेवणखाण झालं नाहीं. झालं कीं येतों. "

ही एव्हढी मोठी मिजास शिपायाला सहन झाली नाहीं. एक चांगली खडसून शिवी हांसडून तो म्हणाला, " धन्याचा हुकूम आहे कीं जुतीं मारीतमारीत घेऊन ये तुला म्हणून. "

पुन्हां दुसऱ्यांदा गफूरचा तोल सुटला. त्यानेंही एक चांगली शिवी हांसडली आणि तडकावून म्हटलें, " राणीसरकारच्या राजवटींत कुणी कुणाचा गुलाम नाहीं. खंड देतों म्हणून इथं राहातों. मी येत नाहीं. "

पण या जगांत क्षुद्र माणसानें एव्हढी मिजास बाळगण्यांत कांहीं अर्थ नसतो, एव्हढेंच नव्हे, तर तेंच मूळ असतें संकटाचें. वाईटांत बरें एव्हढेंच, कीं त्याचा आवाज आंतल्या आंत ओढलेला होता

म्हणून त्याची सारी भाषा शिपायाच्या कानीं गेली नाहीं. नाहीं तर त्याच्या तोंडचे अन्न आणि डोळींची झोप कायमची गेली असती.

त्यानंतर काय घडलें तें विस्तार करून सांगण्याची जरुरी नाहीं. पण एक तासभऱ्याने ज्यावेळी तो जमीदाराच्या सदरेतून परत घरीं येऊन मुकाट आडवा झाला त्यावेळीं त्याचें तोंड आणि डोळे फुलून उठले होते.

त्याला एव्हढी मोठी शिक्षा मिळायला कारण झाला होता महेश. गफूर सकाळीं घरांतून निघून गेला तेव्हा दावें तोडून महेश बाहेर पडला आणि जमीदाराच्या अंगणांत जाऊन त्याने फुलझाडें खाऊन टाकली. नोकर लोक त्याला धरायला गेले त्यावेळीं धन्याच्या धाकट्या मुलीला लोटून घालून तो पळून गेला. ही घटना कांही पहिल्यानेंच घडली नव्हती. यापूर्वीही असेच घडले होते. गरीब म्हणून त्याला माफी मिळाली होती. पूर्वीप्रमाणेंच याही वेळी तो आला असता, हातींपायीं पडला असता, तर त्याला क्षमा करण्यांत आली असती. पण तो जे म्हणाला, कीं खंड देऊन मी इथे राहतों, मी कुणाचा गुलाम नव्हे ! तेच त्याला नडले. रयतेच्या तोंडून मिजासखोर उद्गार ऐकून घेऊन स्वस्थ रहाणे शिवचरणबाबूंना केव्हांही शक्य झालें नसते. तिथे त्याला शिव्या मिळाल्या, फटके मिळाले, पण त्यानें उलटून हात उचलला नाहीं. मुकाट्याने सारें सहन केलें. घरीं आल्यावर सुद्धां तो तसाच मुकाट्याने पडून राहिला होता. भुके-तहानेची त्याला आठवण नव्हती. पण काळजाच्या आंत मात्र बाहेरच्या मध्यान्हींच्या आकाशांतल्यासारखीच आग भडकून उठली होती.

असा किती वेळ गेला तें त्याचें त्यालाच कळलें नाहीं. पण तितक्यात बाहेरून अंगणांतून मुलीची किंचाळी कानीं पडतांच तो

धावतच बाहेर आला आणि पाहतो तों अमीना जमिनीवर पडली होती आणि तिच्या हातची मातीची घागर फुटून पाणी सर्वत्र सांडले होतें—

—आणि महेश एव्हढी लांब जीभ बाहेर काढून तें मातींत पडलेलें पाणी चाटून घ्यायचा प्रयत्न करीत होता.

डोळ्याचें पातें लवलें नाहीं—गफूरचे माथे भडकले—तो अनावर झाला. कालच त्यानें नांगराचा फाळ दुरुस्त करण्यासाठीं काढून ठेवला होता.—तो दोन्हीं हातांनीं उचलून त्याने महेशाच्या पाणी चाटण्यासाठीं खालीं केलेल्या डोक्यावर जोरानें मारला.

एकदांच मात्र महेशनें वर पाहायचा प्रयत्न केला. दुसऱ्याच क्षणाला उपासमारीनें सांपळा झालेला त्याचा देह जमिनीवर कोसळून पडला. त्याच्या डोळ्याच्या कोपराला एकदोन आंसवे आणि कानां-तून तसेच एकदोन रक्ताचे थेंब पाझरले होते. दोनतीन वेळ त्याचे सारें शरीर थरथर कापूं लागले—त्यानंतर समोरचे आणि मागचें पाय जितके लांब ताणले जातील तितके ताणीत ताणीत महेशने शेवटचा श्वास सोडला.

अमीना मोठमोठ्यानें रडत ओरडली, “ काय केलंत बाबा ? आपला महेश मेला ना ? ”

गफूर हालला नाहीं—बोललाही नाहीं. तारवटलेल्या डोळ्यांनीं, तशाच दुसऱ्या दोन निस्तेज झालेल्या काळ्याभोर डोळ्यांकडे पाहात तो दगडासारखा ताठरून राहिला.

एकदोन तासांच्या आंतच गांवांत बातमी गेली. मोची आले आणि कळकीच्या काठीला बांधून महेशाचें प्रेत घेऊन गेले. त्यांच्या हातांत असलेली चकचकीत सुरी दृष्टीला पडतांच अंगावर शहारे येऊन

गफूरनें डोळे मिटले. पण त्याच्या तोंडून एकही शब्द बाहेर आला नाहीं.

पुढें काय करायचें हें जमीदारबाबूंनी तर्करत्नांकडे विचारून घेतलें. प्रायश्चित्ताच्या खर्चासाठीं घर विकल्याखेरीज दुसरा उपायच नव्हता.

गफूरनें तें सारें मुकाट्यानें ऐकून घेतलें. उत्तर दिलें नाहीं. दोन्ही गुडघ्यांत मान खुपसून तो स्वस्थ बसून राहिला होता.

भल्या मोठ्या रात्रीं गफूरनें मुलीला हांक मारली आणि म्हटलें, " अमीना, चल आपण जाऊं. "

ती झोंपी गेली होती. घाबरून डोळे चोळीत उठून ती म्हणाली, " कुठं बाबा ? "

गफूर म्हणाला, " फुलबेड्याच्या कारखान्यांत मजुरी करायला. "

बिचाऱ्या मुलीला अचंबा वाटला. कितीही संकटें आलीं तरी यापूर्वीं तिचा बाप कारखान्यांत मजूर म्हणून जायला राजी नव्हता. तो म्हणे, " तिथं धर्म राहात नाहीं. बायकांची अब्रू, इज्जत राहात नाहीं ! "—कितीतरी वेळ तिनें त्याच्या तोंडून ही भाषा ऐकली होती.

गफूर म्हणाला, " उशीर लावूं नकोस पोरी. केव्हढी तरी मजल मारायची आहे. "

अमीनानें पाण्याचा तांब्या आणि बापाची जेवायची थाळी उचलून घेतली.

गफूर म्हणाला, " तें सारं राहूं दे इथं पोरी. आमच्या महेशाचं प्रायश्चित्त होईल त्यांतून. "

काळ्याकुट्ट काळोखांतून त्या भयाण रात्रीं मुलीचा हात धरून तो बाहेर निघाला. आपलें म्हणायला त्याला त्या गांवांत कुणीच नव्हतें.

आंगण पार होतांच रस्त्याच्या कडेला तो त्या बाभळीच्या खोडाजवळ आला तेव्हां थबकून उभा राहिला आणि हो हो करून रडूं लागला.

नक्षत्रांनीं खचलेल्या काळ्या आकाशाकडे पाहात तो उद्गारला, " अल्ला ! तुला वाटेल ती सजा मला दे, पण माझा महेश तहानेपायीं मेला, त्याच्यासाठीं कबर करायला कुणीं एव्हढी जमीन सुद्धां ठेवली नाहीं, अल्ला ! तूं दिलेलं शेतांतलं गवत, तूं दिलेलं भुईंतलं पाणी, ज्यांनीं त्याला प्यायला दिलं नाहीं त्यांची कसूर कधीं सुद्धां माफ करूं नकोस ! "

# टीपा आणि टांचणें

एका दुर्दैवी मुसलमान कुटुंबाचा अगदीं थोडक्याशा शब्दात सांगितलेला हा इतिहास आहे. बंगालमधील मुसलमान हा तेथील हिंदूपेक्षा मनोभूमिकेच्या दृष्टीने मुळींच वेगळा नाहीं. या कुटुंबातील महेश या नावाचा बैल हाही एक कुटुंबीयच आहे. गफूरचें त्याच्यावरलें प्रेम अपत्य प्रेमाच्या तोडीला येईल इतकें वात्सल्यपूर्ण आहे. बंगालमधील हिंदूंचा अस्पृश्याप्रमाणेंच मुसलमानानाही वागवण्याचा जो एक दृष्टिकोण आहे, त्या दृष्टीनें अभागीची तुलना या कथेशींही करता येईल. स्पृश्यास्पृश्याप्रमाणेच हिंदु-मुसलमानातील तेढ वाढायला इतर प्रान्ताप्रमाणेंच बंगालमध्येंही उच्चवर्णीयाची अरेरावी वृत्तीच कशी कारणीभूत झाली याचे हे चित्रण मोठे उद्बोधक आहे.

**प्रश्नमाला:—**

१ : गफूरच्या दैन्यावस्थेचें वर्णन करा.

२ : गफूरनें महेशला चरावयास न सोडण्याचें कारण काय ?

३ : तर्करत्नाच्या वागणुकींत निर्दयपणा भरला होता. कसा तो सांगा.

४ : तर्करत्न हें बंगालमधील सनातन्यांचें प्रतीक ( Symbol ) आहे ह्यावर तुमचें मत द्या.

५ : महेशला भुकेलेला पाहून गफूरचे हृदय कसे कळवळून येत असे ?

६ : ' सांभाळ करतां येत नाहीं ' आणि ' सोडून देववत नाहीं ' अशी महेशच्या बाबतींत गफूरची स्थिति झाली होती. तिचीं कारणें काय ?

७ : दारिद्र्याच्या ज्वालेवर गफूर, त्याची कन्या आणि महेश जिवतपणीं जळून जात होते. ते कोणत्या अर्थानें ?

८ : गफूर आणि त्याची कन्या अमीना याच्या जीवनातील एखाद्या करुण प्रसंगाचें वर्णन करा.

९ : गफूरला शिक्षा व्हावयास कोण कारणीभूत झालें ? तें कसें ?

१० : महेशचा अंत कशा प्रकारें झाला ?

११ : महेशसारख्या मुक्या प्राण्यावरील उत्कट प्रेमामुळें गफूरच्या जीवनाची वाताहत कशी झाली तें तुमच्या भाषेत सांगा.

१२ : घर सोडून जातेवेळच्या गफूरच्या जीवनातील 'ती अखेरची रात्र,' काळ-रात्र कशी ठरली ?

## भाषा सौंदर्यः—

–वैशाख संपला होता, पण ढगाचा कुठें मागमूसही नव्हता. (पृ. ६३)

–कोरड्या आकाशातून नुसती आग खालीं कोसळत होती. ( पृ. ६३ )

–कडकडणाऱ्या रोजच्या तापाने धरित्री मातेच्या काळजातलें रक्त वाफ होऊन उडून जात होतें. आगीच्या लोळासारखी त्या वाफेची सर्पाकार गति पहात राहिले तर मस्तकात झिणझिण्या उठत–जणू कैफ चढे. ( पृ. ६३ )

–असल्या तापलेल्या तोंडातून जळजळीतच भाषा निघायची. (पृ. ६४)

–गफूरचा चेहरा उजळून उठला. बापलेकीच्या मध्यें हें जे छोटेसें नाटक झालें तें त्या दोघाखेरीज आणखी अंतरिक्षात कुणी तरी एकजण पाहात होता वाटतं ! ( पृ. ७१ )

–स्वतःचा कर्कश आवाज स्वतःच्याच कानी गेल्यामुळे त्याचा राग दुप्पट वाढला. ( पृ. ७६ )

–भुकेतहानेची त्याला आठवण नव्हती. पण काळजाच्या आंत मात्र बाहेरच्या मध्यान्हीच्या आकाशांतल्या सारखीच आग भडकून उठली होती. ( पृ. ७९ )

# शरद् साहित्य



१ शुभदा
२ अनुराधा
३ अरक्षणीया
४ नवविधान
५ सव्यसाची
६ गृहदाह
७ अखेरची ओळख
८ चरित्रहीन
९ छोटाभाई
१० पथनिर्देश
११ हरिलक्ष्मी